॥ श्री ॥

# गांधी टोपी

अर्थात्

# आत्मशुद्धि.



लेखक—

श्रीनिवास नारायण ताडपत्रीकर, बी. ए.



प्रकाशक—

वाङ्मय विहार मंडळ, पुणें.



१९२२



किंमत १ रुपया.

प्रकाशकः—
सदाशीव कृष्णराव शिंदकर.
वाङ्मय विहार मंडळ, पुणें शहर.

मुद्रकः—
बापू श्रीकृष्ण महाजन,
रघुवीर प्रिंटिंग प्रेस. २७ बुधवार पुणें.





# तव्हां आणि आतां !

गांधी टोपी नाटक लिहिण्याची कल्पना मनांत आली आणि पुढील उद्योगास लागलों, तेव्हां १९२१ चा आगष्ट महिना संपत आला होता, आणि मध्यंतरी नाटक रंगभूमीवर येऊन, या वेळीं पुस्तकाच्या आरंभीचें कांहीं तरी लिहावयास वसलों; यावेळीं, आतां-१९२२ चा फेब्रुवारी महिना संपत आला आहे. या अवधींत राष्ट्रातल्या-माझ्या राष्ट्रांतल्या-परिस्थितींत काय फरक पडला, झालेला फरक आनंदपर्यवसायी आणि इष्टप्रद होणार कीं कसा या संबंधी अधिकारानें विचार करणारीं पुढारी माणसें निराळीं असलीं, आणि निश्चयात्मक निर्णय एक कालच करणार, असला, तरी मनांत कांहींतरी विचार येतो एवढें मात्र खरें!

नाटक लिहिण्याचा हेतु महाराष्ट्रीयांच्या डोक्यीला गांधींटोपी कशी काय बसली आहे, हेंच दाखविण्याचा आहे. महाराष्ट्राचें राजकारण-ध्येयाचें दृष्टीनें वस्तुतः एकच असलें तरी साधनांचें बाबतींत त्याचा इतर प्रांताशीं किंचित मतभेद आहे, निदान एकवाक्यता तरी पुरेतेपणी नाहीं, अशी माझी समजूत आहे. ही विचारसरणी चुकीचीही असेल, पण नाटकातील कांहीं पात्रांचा स्वभावपरिपोष यांच दृष्टीनें झालेला असल्यामुळें त्याबद्दल येथें ही सूचना देणें जरूर वाटलें.

नाटकाचा प्रथम प्रयोग नागपूर मुक्कामीं ता. २४ डिसेंबर १९२१ रोजीं लोकमान्य नाटक मंडळीनें केला. मंडळीचे उत्साही मालक व माझे मित्र रा. नानवा बोखले यांनीं मजपासून हस्त लिखितप्रत मिळाल्यापासून अवघ्या एक महिन्याचें आंत प्रयोग केला, पुस्तकांत घालणेंसाठीं आपल्या मंडळीचे फोटोही लगबगीनें काढवून दिले, आणि इतर अनेक प्रकारांनीं मला साह्य केलें-परंतु हें मित्रऋण नुसत्या आभार प्रदर्शनानेंच फिटणार नाहीं. पुस्तक छा... बाबतींत पुष्कळच गडबड झाली. त्यामुळें पुस्तकांत कांहीं प्रमाद राहि...

तील-नव्हे आहेतच—याबद्दल मी वाचक वर्गाची क्षमा मागतो. परंतु या कामीं मला झटून मदत करणारे सद्गृहस्थ-रघुवीर प्रेसचे मालक रा. महाजन, वांङ्मयविहार मंडळाचे मालक व पुस्तक प्रकाशांत आणण्याचें सर्व श्रेय ज्यांच्याकडे आहे, असे श्री. नानासाहेब शिंदकर, फोटोचें सुबक ब्लाक तयार करून देणारे डेक्कन फोटोग्राफिकचे श्री. फडके या सर्व मंडळींनीं मला लवकर पुस्तक तयार करून दाखविलें याबद्दल या सर्वांचा साभार नामनिर्देश केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

नाटक हें पहावयाचें व त्याचप्रमाणें वाचावयाचेंही साधन आहे. या दोन्ही दृष्टींनीं ही माझी कृति जनतेला रुचल्याचें जर मला दिसून येईल, तर मी सर्वस्वींच धन्य होईन.

१०२१ सदाशिव, पुणें.
तारीख २३।२।१९२२

सर्वांचा कृपाभिलाषी,
श्री. ना. ताडपत्रीकर.

आत्मशुद्धि
जगाच्या प्रत्ययाला आणून देणारा आर्यावर्तातील
खरा महात्मा



मोहनदास करमचंद गांधी.

---

महात्माजी,

राष्ट्रांत आपण चालविलेल्या उन्नतीच्या
असामान्य प्रयत्नांमुळें
नाट्यसृष्टींत उत्पन्न झालेली
ही
**गांधी–टोपी**
आपणांशिवाय मी दुसऱ्या कोणाला
**अर्पण**
करूं?

आपला नम्र,
–लेखक.

|| श्रीराम ||

# गांधी टोपी अर्थात् आत्मशुद्धि.

## अंक पहिला.

[ स्थळ—घरांतील दिवाणखाना. त्रिंबकराव कचेरींतून परत येतात. सगुणाबाई त्यांचे कपडे उतरून ठेवते. ]

**त्रिंबक**—वसंत, अरे वसंता—

**सगुणा**—भाऊजी घरांत नाहींत, बाहेर गेले आहेत.

**त्रिंबक**—मला वाटलेंच होतें तसें. अन् ताई कुठें दिसत नाहीं ती ?

**सगुणा**—त्याही भाऊजींच्या बरोबरच बाहेर गेल्या. येतील दोघेही लव-करच परत—काय काम होतें ? मला सांगायचे होतें, हवें तर.

**त्रिंबक**—मला कांहींच नको आहे. पण मी पाहतों आहे, या पोरांची वागणूक जास्त स्वतंत्र होऊं लागली. बरें नव्हे हें !

**सगुणा**—आतां परतंत्र रहायला तीं कां लहान आहेत ? अन् स्वतंत्र वागणुकींत असें गैर काय दिसतें ? शहाणपणाचें स्वातंत्र्य मुद्दाम द्यायचें नाहीं यांत सुद्धां स्वतःकडे जरा दुराग्रहीपणाच येत नाहीं का ?

**त्रिंबक**—पण तशी दुराग्रहीपणाची वृत्ति निदान माझी तरी तुम्हां कोणाला कधीं दिसली आहे काय ? संसारांत काय किंवा देशांत काय माणसें करतीं-सवरतीं झालीं म्हणजे त्यांना आपापला उद्योग करूं द्यावा ही समंजसपणाची रीतच आहे. पण या पोरांच्या डोक्यांत हें जें देशभक्तीचें वारें अलीकडे शिरूं लागलें आहे. तें, खरें विचारशील तर आपल्याला कांहीं पसंत नाहीं. मनुष्यानें थोडा विचार ठेविला पाहिजे.

**सगुणा**—देशभक्तीमुळें असें कोणतें नुकसान व्हायला लागलें आहे की, ती आपल्या मनांतून एकदम उतरली ? देशभक्ति करणें, “माझ्या आई इतकीच मी

माझ्या मातृभूमीवरही निष्ठा ठेवणार " या ह्मणण्यांत इतकें कां भयंकर पाप भरलें आहे? यांत असा अविचार तो काय होतो?

**त्रिंबक**—ह्मणण्यांत तसें आतां पाप राहिलें नाहीं. हें मलाही कबूल आहे. प्रसंगाला आम्ही सुद्धां आमच्या साहेबांजवळ आमच्या देशाची तरफदारी करतों, तें आमचें बोलणें आमच्या साहेबाला पटून तोहि म्हणातो कीं. 'यू आर राइट' पण झालें इतकेंच? याच्या पुढें जाऊन जर उद्यां आम्ही कृतीनें त्याला विरोध दाखवायाला लागलों तर? तो लगेच आह्माला सांगेल कीं, 'तें कांहीं नाहीं, यू वॉक् अवे अॅट् वन्स्' ह्मणून म्हणतों कीं माणसानें जरा विचार ठेविला पाहिजे.

**सगुणा**—आपण तरी कशाला त्यांचें करणें इतकें जिवाला लावून घ्यावयाचें तें? त्यांचें त्यांना आतां सारें समजतें.

**त्रिंबक**—(वसंत व वेणू प्र क. त्यांजकडे बोट दाखवून) हें हेच समजतेंना? माझा प्रत्यक्ष भाऊ आणि वहीण या सिडिशस् ड्रेसमध्यें हिंडतांना लोकांनीं पहायची, यांची ती स्टेज लेक्चर्स् लोकांनीं टाळ्यांच्या गजरांत ऐकायची आणि या यांच्या लीलेचा परिणाम मात्र आम्हीं मुकाटयानें सोसायाचा हेंच यांचें समजणें वरोवरच आहे; ताबेदारीचा खोडा कसा असतो, नोकरीचे जूं खांद्याला कसें टोचत असतें याची कल्पना तुह्माला काय होणार? वसंत, ताई, तुमचें हे थेर जोपर्यंत घरांत चालत होते, तोपर्यंत तुह्माला आडवा आलों नाहीं. पण, आय् कान्ट् हेल्प् इट् नाऊ.

**वेणू**—दादा असें झालें तरी काय? तुमच्या पाठीवर जन्म घेऊन आम्ही तुमच्या पोटीं आल्याप्रमाणें वागावें हेंच आमचें कर्तव्य आहे. तुम्हाला त्रास होणारी गोष्ट कशीं वरें करूं आम्ही?

**त्रिंबक**—कशी ह्मणजे ही अशी! गांवातल्या चळवळींत तुम्ही पडलां त्याचा बोल माझ्यावर आला. पाठीवरचे तुम्ही पोटच्यासारखे वागणार पण हें पहायाच्या .वी माझी पाठपोठ एक होण्याची पाळी येऊं लागली आहे.

**वसंत**—वहिनी, दादांना चहा नाहीं दिला वाटतं अजून! जा, जा, आधीं एक डबल् एकदम गरम! काय सृष्टींतला विरोध तरी! गरम चहा घेतला कीं मनुष्य एकदम शांत-थंड होतो दादा; मला वाटते याच तत्वावर होमिओपाथी निघाली असावी नाहीं? गरम झालेली वृत्ति गरम चहानें थंड होते उष्णेन उष्णं शाम्यति!

**त्रिंबक**—वसंत, धिस् इज् नो जोक, तुला सगळी थट्टा वाटते आहे, आय् अॅम्

रीएली सीरिअस. तुम्ही दोघांनीं आपली देशभक्ति खरोखरच जरा आवरून धरली पाहिजे. [ सगुणा चहा आणते ]

त्रिंबक—एकच कप! अन् वसंताला नको कां? ताई, तुला पाहिजे ना चहा?

वेणू—नाहीं दादा, आम्ही दोघांनींही चहा सोडला आहे!

त्रिंबक—चहा सोडला! शेम्! शेम! चहा सोडून दुसरें काय धरलें? हें कसें काय बुवा! आपल्याला नाहीं हें पसंत. तें कांहींएक नाहीं चालायचें. तुह्मी चहा घेतलाच पाहिजे. तरी ह्मटलें तुह्मी आताशी चहाची वेळ चुकवीत कां असतां! चला आणखी दोन कप आणा. ताई, वसंत तुह्मी दोघेही चहा घ्या! म्हणजे ओव्हर धिस् टी आपल्याला तुमच्या या देशभक्तीबद्दल बोलतां येईल.

वसंत—तसेंच बोलायला सुद्धां आमची तयारी आहे. पण हा चहाचा आग्रह आतां नको.

त्रिंबक—म्हणजे? तूं तर अगदी सीरिअसच झालास? काय ग ताई, तुझें काय?

सगुणा—मी सांगूं कां? आपल्याला पाहिजे, आपण घ्यावा हवा तितका; दुसऱ्याला आग्रह करूं नये.

त्रिंबक—म्हणजे आपणही टीटोटॅलर बनला कीं काय? अरे, माझ्या घरांत हा आकाबाईचा फेरा पुरताच शिरला ह्मणायचा!

वेणू—दादा, असें काय करतां तें! नुसत्त चहा घेत नाहीं म्हटलें तर तुह्मांला आकाबाईचा फेरा आल्यासारखें वाटलें—

वसंत—मग उद्यां हिंदुस्थाननें स्वराज्य मिळविल्यावर तर काय मला वाटतें महाप्रलय झाल्यासारखें होईल तुह्मांला. दादा ही गुलामगिरीची संवय बरें, मनाचा दुबळेपणा—

त्रिंबक—अरे हां! आहे माहीत तुझी अक्कल. मला हें ब्रह्मज्ञान आपण शिकवायाला नको अं!

वेणू—दादा हें ब्रह्मज्ञान नव्हे. ब्रह्मज्ञानाचा विचार शांतपणानें करायला मिळावा म्हणून साधनें मिळविण्याची ही खटपट आहे.

वसंत—इतकें तरी हें कशाला? मी म्हणतों स्वराज्यापेक्षां तूर्त तरी आम्ही ब्रह्मज्ञानाला जास्त महत्व देत नाहीं.

त्रिंबक—तुम्ही महत्व देत नाहीं-तुह्मी कोण हो असे टेकोजी! मोठेस्वराज्य

मिळवायाला निघाले आहेत! तुमचें एक वर्षांत येणार होतें ना स्वराज्य? मग काय झालें? कां इंग्लंडमधून येतांना टिटॅनिकचा ॲक्सिडेंट होऊन समुद्रांत बुडालें?

**वेणू**—वर्षांत मिळणारें स्वराज्य इंग्लंडहून नव्हतें येणार दादा; त्याचें पीक हिंदुस्थानांतच व्हावयाचें होतें, पण वेळेला आर्यपुत्रांच्या कृतीचा पाऊस पडला नाहीं त्या मुळें तें रोपटें तसेंच खुरटून चाललें आहे.

**वसंत**—आर्यपुत्र? ताई आर्यपुत्र आज कितीसे हयात आहेत? आर्यपुत्र पृथ्वीराजाबरोबर गेले, आर्यपुत्र छत्रपती शिवाजीराजाबरोबर गेले, आर्यपुत्र परवां लोकमान्यांबरोबर नाहींसे झाले! आतां आर्यपुत्र राहिले नाहींत!

**त्रिंबक**—तुमचे आर्यपुत्र मरून गेले तर बसा रडत? काय लोकांची नाटकी भाषा चालली आहे! खरेंच वसंता, आतां कॉलेज तर सोडलेंसच, एखाद्या कंपनींत तरी जा? एज्युकेटेड म्हणून चार पैसे तिकडे जास्त मिळतील!

**सगुणा**—वन्सें हें वाढत चाललें बरें कां, नेहमीसारखें एकदम रागवायाचें होईल.

**वसंत**—दादांचा राग ना? हात्तिच्या! चहाच्या चार कपाचा मारा केला कीं, राग तेव्हांच परागंदा होतो.

**वेणू**—अरे तूं तरी ही चेष्टा आतां पुरे कर. दादा थोर महात्म्यांनीं चहा सोडा म्हणून सांगितला म्हणून सोडायचा नसेल तर त्यानें आपलें किती अकल्याण केलें हें पाहून तरी सोडा. चहानें साखरेला किंमत आली, दूध नव्हें दुधाचें पाणीसुद्धां महाग झालें! महारापोरापर्यंत ही सिंगल डबलची गेम चालली, देशावर केवढी तरी आपत्ति आली? सहज कोणी भेटीला गेला, आणि त्याला चहाचा कप पुढें केला नाहीं, तर लगेच शिष्टाचाराचा भंग होऊं लागला, इतकी या चहानें आह्मांवर सत्ता सुरू केली आहे, तेव्हां या स्वतंत्र विचारांच्या काळांत निदान आम्हीं व्यसनाधीन नाहीं एवढें सिद्ध करण्यासाठीं तरी आह्मीं चहा सोडायला नको कां?

**त्रिंबक**—फूल्स् वन् ॲंड् ऑल? तुह्मांला कांहीं एक समजत नाहीं. लोकमान्य टिळक आज चाळीस वर्षे स्वराज्याविषयींच बोलत होते, पण त्यांनीं चहाविरुद्ध एक दिवस कधीं ब्र काढला नाहीं; आणि हें तुमचे महात्माजी आले तों आपली एकदम चहावर मोहीम सुरू? हें शक्य नाहीं! ही चहाची मुव्हमेंट् फेल होणार! होणार कसली झालीच.

**वेणू**—अमेरिकेनें स्वातंत्र्यासाठीं युद्ध पुकारलें, त्याच्या आरंभीं चहावरच बहिष्कार घातला होता. चहाचें पिढ्यान्-पिढ्या व्यसन बाळगणारे अमेरिकन लोक पण त्यांचा निग्रह एवढा दांडगा कीं, कर द्यायचा नाहीं म्हणून चहाचीं जहाजें समुद्रांत बुडविलीं, आणि आह्मांला एका पिढीतच हा चहा अजिंक्य होऊन बसला! दादा, ही गोष्ट काय सुचविते?

**वसंत**—बोला, दादासाहेब, ही गोष्ट काय सुचविते? पुढच्यांची एवढी सुद्धां गोष्ट आम्हाला पाळवत नाहीं, असल्या दुबळ्या दिलाचे, कुचकामाचे लोक स्वराज्याला कसे पात्र ठरणार?

**त्रिंबक**—अरे जारे स्वराज्याच्या? मोठ्या देशभक्तीच्या गप्पा मारायला लागला आहे, इंग्रजांची शिकवण एक शतकभर गिरवीत बसलां तेव्हां आतां कुठें स्वराज्य हा शब्द तुह्माला नीट बोलतां यायला लागला. हीं श्मश्रु नुकतीं दृश्यायमान व्हायला लागली, अजून अनुभव किती तरी दूर आहे.

**लीला**—( गडबडीनें प्र. क. ) नाहीं नाहीं दादा! प्रत्यक्ष अनुभव यायला सुरवातही झाली! आमच्या काकांनीं वकीली सोडली!

**वसंत**—कां दिक्षीत, मुख म्लान झालें? शंका निरसन झालें वाटतें? दादा, तुम्हाला खरेंच सांगू कां?

**त्रिंबक**—नको, मला तुझें खरें हीं नको आणि खोटेंही नको त्या खरकट्याची घाण तूंच काढीत बैस जा! तुह्मी तरुण मंडळींनीं या गांधींसुद्ध-मेंट्ला उचलून धरायचा घाट घातला आहे; पण हें तुमचें फसणार बरें!

**वसंत**—हो न फसायला काय झालें? आमच्या घटाच्या पायऱ्या मोडायला तुमच्यासारखी वृद्धक मंडळी हात सावरून तयार झाल्यावर आणि आम्हाला चेचायला तुम्हीच सरकारच्या कुशींत शिरल्यावर—

**त्रिंबक**—हं तोंड आटप वसंत! माझा इन्सल्ट होतो आहे!

**लीला**—दादा, यांत कसला हो इन्सल्ट? खरें बोलण्यानें इन्सल्ट होतो, खोटें बोलणें कॉन्शन्स्ला पटत नाहीं.

**वेणू**—ह्मणून अशा प्रसंगीं थोडी गय खाऊन गप्प बसावें.

**लीला**—गप्प बसूनच तर इतक्या थरावर गोष्टी आल्या! वडिलांचा अपमान होतो ह्मणून समजून उमजून तरुण मंडळी स्वस्थ बसली.

**त्रिंबक**—लीले, तू अजून बच्चा आहेस. तुला यांत काय कळणार?

**वसंत**—तिला कळत नाहीं म्हणून तिच्या बोलण्याला महत्त्व नाहीं, आह्मीं कळून सुद्धां बोलायचें नाहीं, मग तुम्हाला तुमच्या चुक्या सांगायच्या कोणी?

**त्रिंबक**—वसंता—

**सगुणा**—पहा मन्सं, आलें भांडणाला! (त्रिं. स.) तिकडल्या खोलींत चलायचें होतें. (त्रिंबकरावाला घेऊन जाते.)

**वसंत**—जा जा! दादाला दोन कप चहा दे वहिनी म्हणजे येतील नरम!

**वेणू**—वसंत दादाला असें संतापवूं नको. अरे, त्यांना गोष्टी कळत कां नाहींत या? आज देशांत इतक्या चळवळी चालल्या आहेत, जिकडे तिकडे घरीं दारीं या एकाच गोष्टीचा बोलबोला गरजतो आहे, सगळें वातावरण स्वराज्याच्या प्रभावशाली तेजस्वी विचारांनीं दुमदुमून राहिले आहे, आणि या सगळ्या परिस्थितीचा परिणाम आमच्याच आईबापांच्या पोटीं जन्मलेल्या आमच्या नोकर बंधुवर्गावर कसा झाल्याशिवाय राहील? हिंदुस्थानांत जन्म झाला, हिंदुस्थानाच्या अन्नपाण्यावर त्याच हवेंत ज्यांचा देह वाढला, त्या प्राण्यांना हिंदुस्थानच्या भरभराटीचे प्रयत्न होऊंच नयेत, त्यानें रसातळाला पोचावें असें वाटेल तरी कसें? पण दोन तीन पिढ्याला अंगात मुरलेला हा मनाचा दुबळेपणा त्यांना बोलूं देत नाहीं. सरकारची त्यांना भिती वाटते, तीहि बरोबरच आहे.

**लीला**—मॉरल् करेज् नाहीं! अशांनीं मी म्हणते निदान विरोध तरी करूं नये. हातांनीं होत नाहीं तर आपलें स्वस्थ बाजूला रहावें आमचे आम्हीं पाहून घेऊं.

**वसंत**—हो, पण लीले तुझ्या काकांची हकीकत या दादांच्या बोलण्यांत तशीच राहून गेली. तूं मोठ्या उत्सहानें आलीस सांगायला पण तुझा विरस झाला!

**लीला**—मग आतां खेदप्रदर्शनाचा एक ठराव पास करा म्हणजे झालें सगळें. तांइ आहेच अध्यक्षस्थानीं!

**वसंत**—अध्यक्ष झाल्यावर माझ्या ठरावाला दुजोरा, कोण देणार? तुझ्या बद्दलच्या ठरावाला तूंच पुष्टि देणें हें नियमाला सोडून होईल, बरें, अध्यक्षांनीच एक सदस्य म्हणून केव्हां केव्हां ठराव उचलून दिल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत, पण तें आह्माला मुळींच पसंत नाहीं.

**वेणू**—वसंताला पसंत नसलेली गोष्ट लीला तरी कशी करील? तो ठराव

राहूंदेच तूर्त, पण लीले तुझ्या काकांनी वकीली सोडली ही गोष्ट खरोखरच फार चांगली झाली.

**वसंत**—आतां काय देशभक्तीचे अष्टाधिकार काकांच्या हातांत खेळूं लागतील ना? आज काका दे. भ. झाले! लीले, मी तुझे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

**लीला**—मनःपूर्वक म्हणजे मन पूर्वीच बाजूला ठेवून, म्हणजे वरवर असाचना अर्थ? मला नको जा तसला शिष्टाचार! हें काय हो आतां मात्र माझ्या उत्साहतां तुह्मी भंग केलांत! मी नाहीं जा तुमच्याशीं बोलायचीं? ताई, चल ग आपण इथून जाऊंच कशा.

**वसंत**—वंगभंगाबद्दल साखरेवर बहिष्कार, तसा हा माझ्यावर बहिष्कार वाटते? पण लक्षांत ठेवा अं! त्या वेळीं इर्षेनें साखर सोडलेली बहुतेक मंडळी आतां यथेच्छ साखर खायला लागली आहेत.

**लीला**—पण वंग भंग रद्द झाल्या नतंर ना? मग मीहि माझा उत्साह-भंगाची भरपाई होऊन मिळाली म्हणजे तुमच्याशीं जास्त गोडीनें बोलूं लागेन तें कांहीं नाहीं तुह्मी माझे अभिनंदन मनापासून केलें पाहिजे.

**वसंत**—मनापासून कुठपर्यंत?

**लीला**—मनापासून जनापर्यंत. लोकांत सुद्धां तुह्मी काकांची वाहवाच केली पाहिजे.

**वेणू**—लीले, तुला एवढी शंका कां वाटते? वसंताचें एक राहो, पण सगळे लोक खात्रींनें काकांना चांगलें म्हणतील.

**वसंत**—कोणीहि चांगलें म्हणणार नाहीं. मला असें तोंडदेखलें बोलतां येत नाहीं. नुसती वकीली सोडली म्हणजे लगेच हार गजरे घेऊन तुमच्या पाठीमागें धावण्याइतके लोक आतां दुधखुळे राहिले नाहींत. आजकाल लोकांची वहावा मिळवायला खरोखरच कांहीं तरी करून दाखवायला लागते. उगीच वकीली सोडली करा वाहवा, शाळा सोडली भरीव सभा, प्रोफेसरी सोडीली दे लेक्चर, यांत काय अर्थ आहे? लोकांना आतां ज्यास्त भरीव सेवा पाहिजे आहे. पोकळ बडबडीचें यूग संपत आलें म्हटलें ताईसाहेब.

**लीला**—पहा, ताई तूं तरी पहा. कसें बोलणें वर्मी चाललें आहे तें.

**वेणु**—लीले, तूं माझें ऐक; त्याच्याकडे लक्षच देऊं नकोस कसें.

**वसंत**—नाहीं तरी तिचे लक्ष्य म्हणजे दृष्टि तुझ्याकडेच आहे. पण कानाल काय करायचें. ते माझें बोलणें कोठूनही ऐकणारच. !

**लिला**—मी घरींच जाऊन बसतें; मग पाहूं वरें तिथूनही हा वाचाळपणा ऐकण्याइतके माझे कान लांब आहेत कीं कायतें ? [रागानें जातें ]

**वेणू**—झालें! विचारी रागावून रुसून गेली ? तिला त्रास देण्यांत तुला कसला आनंद वाटतो !

**वसंत**—मला आनंद वाटतो म्हणून तिच्या बरोबर तूंही त्रासून जायला नको, ताई. पहा आतां तिला हसवीत परत आणतों. [जातो ]

**वेणू**—(त्याकडे पहात) या साध्यासुध्या निष्पाप आनंदाला सुद्धां तरुणपिढी पारखी होत चालली! परिस्थितीच्या चक्रांत पिळून निघत असतां आनंदाची आठवणतरी रहाणार कशी ? वसंत, लीला यांचा संसार—परमेश्वराच्या मनांत काय आहे कोण जाणे! [जाते. ]

**सावळा**—( प्र. क. ) वेणू कोणत्याही स्थितींत पाहिली तरी मोहकच दिसते आहे! पोरा बरोबर पोर, थोरा बरोबर थोर, बायकांत बायको, मुलांत मूल आणि माझ्या हृदयांत वेणू. माझ्या हृदयांत तूं एक मनमोहन गुलाबाचें फूल आहेस! या वेणूची मोहिनी छे, ती कितीही मोहक असली तरी तिच्या मनाच्या कलाविरुद्ध एक शब्द बोलण्याची छाती होत नाहीं! वेणूचें मन मोडण्याची मला भीति वाटते कां ? छे, माझ्या सुखाकडे पहाणारा मी. मला तिच्या मनाशीं काय कर्तव्य ? माझी मजा मनाप्रमाणें चालण्यासाठीं मला वेणू पाहिजे. मग वेणूपुढें मी बोलत कां नाहीं ? मी भ्याड आहे कां ? मला कशाची भीति वाटते ? फजीतीची ? छे ! वेअब्रू सावळारासाजवळ अब्रूची चाड नाहीं ? मला अपयशाची भीति वाटते ! ही वेणीच्या केसासारखी मऊ वाटणारी वेणू एकांत-एक पेड विणून नेलेल्या वेणीप्रमाणें आयत्यावेळीं टणक झाली तर ? [खिडकींतून पाहतो].

**बाळकोबा**— (प्र. क.)काय पहातां हो ? मला तर खालीं रस्त्यावर कांहीं दिसत नाहीं.

**सावळा**—पहात होतों , पण आतां काय त्याचें ! गेलें ! जाऊं द्या झालें ! ' जग अळवावरचें पाणी '—

**बाळ**—गेलें ? असें कसें गेलें ? अन् तुम्ही जाऊं दिलें तरी कसें ? थांबा, मी पाहातों माझ्या हातीं लागतें आहे कीं काय तें ?

सावळा—रस्त्यावर तुमच्या हातीं विशेष भानगड न होतां लागेल रस्त्यावरची भाती; पण दुसऱ्या कशावर जर हात पडेल तर त्याला तिथेंच अटकाव होईल.

बाळ०–आपलें हातपाय इथेंच ठेऊन नुसती दृष्टी फिरवायला तर कुणाची भीति नाहीं!

सावळा—नुसत्या दृष्टीनें काम करायला मनुष्य जरा निराळ्या सृष्टींतला लागतो. या मागें, उगीच वाकून पहातां पहातां रस्त्यावर पडाला आणि घराच्या मालकांची खिडकी मोडल्याची नुकसानी भरून द्यावी लागेल.

बाळ०–थांबा हो; जरा यत्न करून तर पाहूं. त्या समोरल्या बाजूला—ग्यालरी मध्यें—

सावळा—कुठें? कुठें? थांबा. पाहूं दे मला!

बाळ०–कां दृष्टि ठरली, बरोबर ठिकाण मिळालें? सापडली कीं नाहीं? बोला आतां!

सावळा—कोणती? कोणती म्हणतां ती? ती—ती? इकडे पाठ करून उभी आहे ती ह्मणतां कीं काय?

बाळ०–कसा आंगलोट दिसतो आहे? आहे कीं नाहीं गंमत बोला आतां?

सावळ.—तें पहा तोंड फिरलें इकडे? कांहो तुह्मी का तोंड फिरविलें? 'ह्मातारी उडतां नयेचि तिजला!'

बाळ०–अहो ती नव्हे हो! तुह्मी भलतीकडेच पहातां आहां? मी ती-ती त्या तिकडली ह्मणतो आहे!

सावळा—ती–वाः? मोठेंच रंगेल दिसतां हो? माफ करा, ती माझी सगुणाताई?

बाळ०–बापू, नुसत्या ती आणि ही अशा मोघम बोलण्यानें तुमचा हा गैर समज झाला. काय ह्मणतात तुमच्या इंग्रजींत? आय अॅम्–सारी-झालें ना? बोला आतां.

सावळा—काय बोलूं तुमचें कपाळ? मी माझ्या विचारांत रंगलों होतों तों तुह्मी येऊन असा बदरंग केलात..

बाळ०–विचार? बस्स! त्याचसाठीं मी आतां आलों होतों. ह्मटलं, तुमचा विचार घ्यावा, अन मग ठरवावें काय तें.

सावळा—काय ठरवणार? विचार कसला? आहे काय भानगड ही?

वाळ०–तशी भानगड नाहीं ? पण ह्मटले, उगीच तुमचा मागाहून बोल यायला नको.

सावळा—मुद्याची गोष्ट बोला ! उगीच इकडं तिकडं नका लावूं.

वाळ०–इकडं तिकडं नाहीं तरी अजून आपलें तें गपंचिपंपैकीच आहे म्हणून म्हणतों बोला आतां, पुढें कसें जायचें,

सावळा—पण पुढें जाण्याला तुह्मी आलां आहां कुठवर हें तुमच्या कडून नको कां समजायला ?

वाळ०–कुठवर ह्मणजे हा तुमच्यापावतर आलें एवढाच? पण आतां पुढें जायचें समजेना नीटसें.

सावळा—आतां असेंच पुढें जायचें ह्मटलें तर त्या खिडकीतूनच तुह्मांला रस्त्यावर पडलें पाहिजे. तेव्हां सरळ मार्ग ह्मणजे इथून माघार घेऊन आपले राजरोस जिन्यानें चालूं लागणें–

वाळ०–तुमच्या लक्षांत नाहीं आलें माझें म्हणणें—

सावळा—पण तुह्मी नीट सांगितल्याशिवाय लक्षांत यायला मी कां योगी आहे ?

वाळ०–योगी नाहीं पण संयोगी आहां, आणि संयोगी गुरू आहांत; ह्मणून ह्मणतों बोला आतां, शिष्यस्तेहं शादी मां । माझ्या शादीबद्दलची गोष्ट आहे, बोला आतां.

सावळा—शादी अन् कुणाशीं करणार? कां ठरली सुद्धां ? मग गृहस्थहो, फिस्ट नाहींतर पेढे तरी ?

वाळ०–अहो फीस्ट फीस्ट काय करतां ! हें लग्न झालें कीं आपण एक फीस्टचा सप्ताहच ठोकून् काय! तेव्हां बोला आतां, युक्ति अशी निघाली पाहिजे कीं नेमकी गोळी लागली पाहिजे आणि पुन्हां आपण त्यांत आपले नामानिराळे राहून गेले.

सावळा—तुम्हीं लग्नांत कसे बुवा नामानिराळे राहणार ! अजून लग्नापुरता दुसरा वकील नेमून देण्याची आपल्यांत कांहीं चाल पडलेली नाहीं. पण मुलगी कोणाची ठरवली तें तरी—

वाळ०–अहो तीच मी तुम्हांला मघाशी दारववीत होतों, पण तुम्हीं भलतीकडेच वळलां; ह्मटलें द्या सोडून; मुलगी–समोरच्या काका वकिलांची.—

**सावळा**—कोण लीला? वाळकोबा, तुम्ही मला कांहीं तरी वात ठोकून देतां आहां झालें.

**वाळ०**—छे छे, अहो मुलगी खरोखरच मी पसंत करून ठरवूनही टाकली बोला आतां! आहे कीं नाहीं? 'चमक चमक बिजलिया चमके'!

**सावळा**—तुम्ही ठरविली. आणि काकांनीं याला होकारही दिला म्हणतां?

**वाळ०**—मी तसें केव्हांही म्हटलें नाहीं. तो होकार मिळविण्याबद्दल तर तुमचा सल्ला विचारायला आलों; आतां बोला.

**सावळा**—(हसतो) वाळकोबा, तुम्ही मला चांगलेंच बनविलेंत कीं हो. म्हणजे तुम्ही आपल्या मनाशीं ठरविलेत कीं ही मुलगी आपल्याला असावी.

**वाळ०**—हो, बायको म्हणून.

**सावळा**—आणि तेवढयरावर आम्ही फीस्टचा सप्ताह झोडायला अस्तन्या सारून तयार झालों तेव्हां शहाणे कोण आणि मूर्ख कोण?

**वाळ०**—तें याच्या निकालावरून मग ठरवितां येईल. पण तूर्त मला पुढची वाट दाखवा. वरपक्षांकडून वधूपक्षाकडे मागणी कशी घालायची, वधूवरांचें संमेलन कसें भरवायचें—

**सावळा**—संमेलनाचा सेक्रेटरी कोण? स्वागत कमिटीच्या मेंबराची वर्गणी किती!—

**वाळ०**—अशी प्रेमाची थट्टा करूं नका बुवा! मी तुम्हांला शरण आहे—
[गुडघे टेकतो]

**सावळा**—ठीक आहे. शरणागतास अभय असो. वत्सा, तुझें इच्छित कार्य यत्न करशील त्या मानानें सिद्ध होईल असा माझा तुला आशीर्वाद आहे. [पडदा]

---

## प्रवेश दुसरा.

[काकांच्या घरापुढील भाग. काका मंडळींना निरोप देत आहेत.]

**काका**—या आतां; तुम्ही माझ्यासाठीं इथवर येण्याची तसदी घेतलीत, मी तुमचा फार आभारी आहे. मुद्दाम येऊन असें माझें अभिनंदन कर-

टींतल्या 'युअर लॉर्डशिप्' पेक्षां आपण स्वतःच नाटकांत लॉर्ड व्हावें स्त चांगलें. बस्स ठरलें ?

मा—काय ठरलें ? माझें कपाळ ?

ाका—वरेरकरांच्या रावबहादूर काळ्यासारखी सपाटून रागावून बोल कीं! ण बायकांना रागच येत नाहीं. आमच्या महात्माजींचा खरा उपदेश तुह्मी ांनीं पटवून घेतला आहे; किंवा याच्या उलट महात्माजींनी आपल्य ्या चळवळींत तुम्हां बायकांनां गुरु करून घेतलें आहे, असें माझें मत . महात्माजी नोकरशाहीवर रागावतात, कोणाला 'सैतान' म्हणतात, पण या आरडाओरडींचें पर्यवसान काय तर असहकारिता ? सत्याग्रह ? ्याला पटत नाहीं—तर आपलें बाजूला बसा. त्यांच्या भानगडींतच पडूं

उमा—पण मी तशी स्वस्थ बसायची नाहीं हो. अजून माझी तशी खात्री नाहीं. आपण जर खरोखरच वकीली सोडून 'हरि हरि' ह्मणत टाळ- ्चें ठरविलें असेल, तर मीहि माझा घरधंदा सोडून रात्रंदिवस आपल्या कपाळीं ओरडत बसेन ? आपल्यावर रुसून बाजूला बसले तर आपलें बिघडणार त्यांत ?

ाका—अस्सें. म्हणजे तुझें रिस्पॉन्सिव्ह कोऑपरेशन-विरोधी सहकरितेचें आहे म्हणायचें ? आहेस, खरी महाराष्ट्रीय आहेस! लोकमान्यांच्या पुण्यांतच बाळपण गेलेलें, तुझे विचार त्या वळणावर गेले हें रास्तच आहे. पण आह्मी ं काय ? आज लोकमान्य गेले त्यांच्या मागें महात्माजींच्या शद्बावर सगळें हलतें आहे. त्यांचा शद्ब मोडला तर आह्मीच मूर्ख ठरूं. म्हणून कॉंग्रेसची मानून वकीली सोडली झालें.

उमा—म्हणजें खरेंच का वकीली सोडली ? अन् आतां दुसरा उद्योग काय करणार ?

काका—दुसरा उद्योग आतां आपण सुचविलांतच ना ? पहातों, गंधर्वांकडे ला लावतों; जोगळेकर वकीलीचा अभ्यास करूनच नाटकांत शिरले होते, ं मी तर परीक्षा देऊन चांगली प्रॅक्टिस करून नाटकांत जाणार, त्या ानें मला जास्त नाहीं का मान मिळणार ?

उमा—पुरें नाहीं कां झाली थट्टा ?

काका—मला तर थट्टा करण्याचा कधींच कंटाळा येत नाहीं. त्यांत थट्टेचा विषय असलेली व्यक्ति जसजशी चिडत जाईल तसा थट्टेला तर जास्त रंग चढत जातो; कोर्टांत सुद्धां केव्हां केव्हां—

उमा—पुरे झाली आतां कोर्टाची बडबड!

काका—जशी आज्ञा! कोर्टाची बडबड घरांत आपल्याला सुद्धां नकोशी झाली, मग आम्ही केलें तें आपल्या पसंतीला उतरलें असें सहजच निष्पन्न झालें.

उमा—आपलें काय जातें वाटेल तसें भकत बसायला! आमचे मात्र अतां पुरे हाल आलेग बाई! चांगला सुखासमाधानांत संसार चलाला होता. गोडधड खायाप्यायाला, चांगलं चुंगलं ल्यायलासवरायला मिळत होतें, तें पाहवलें नाहीं. देवा! अशी कशीरे दुर्बुद्धि आठवली इकडे! आपला पोटापाण्याचा उद्योग संभाळून कां हीं लेक्चरांचीं कामें करतां येत नाहींत! आतां आपण हातांत भिकेची झोळी घेतली, आमच्याही हातांत पोळपाट लाटणें एकदां द्यायचें होतें म्हणजे सगळ्याचें डोळे थंड होतील?

काका—ठीक आहे, तशी व्यवस्था करतां येईल. स्वराज्य फंडाकरितां आम्ही भिकेची झोळी काखेला लावली, उद्यां स्वराज्य मिळून देश स्वतंत्र झाला म्हणजे गोरगरीबाच्या किंवा दनिदुबळ्याच्या पोटासाठीं जी जेवण्याची व्यवस्था सार्वजनिक म्हणून करण्यांत येईल, त्या कामांत आपणासारख्या पुढाऱ्यांच्या बायकांनींच पोळ्या लाटून स्वयंसेवा केली पाहिजे. त्यावेळीं एवढ्या मोठमोठ्य गृहस्थांच्या बायका आंधळ्यापांगळ्यासाठीं स्वतः पोळ्या लाटतांना पाहून खरो खरच सगळ्यांचे डोळे थंड होतील.

उमा—अडलय् माझें खेटर त्या भिकारड्यांसाठी कष्ट करायला! आपणाल वाटेल ते आपण करावें. काय समाजसेवा देशभक्ति करायची असेल ती खुशाल करावी, पण मी मात्र आपल्या या कोणत्याही गोष्टी करायला तयार नाहीं सेवाच करायची तर देवळांत देव कां थोडे आहेत?

काका—देवळांतले दगडाचे देव—ते तुमच्या प्रार्थनेला कसले उत्तर देणार तुमची सेवा आवडल्याचें चिन्ह त्या देवाच्या चेहेऱ्यावर काय दिसणार त्यापेक्षां या जगभर परमेश्वराच्याच चालत्या बोलत्या मूर्ति पसरल्या आहेत त्यांची सेवा करा आणि धन्यवाद मिळवा.

उमा—आहेत ठाऊक या जगातल्या मूर्ति? यांची कीर्ति इकडून नको कांहं

चर्णन करायला? काय म्हणें जनांतला जनार्दन! या जनाला तुमच्या सेवेची चाड आहे कां? एवढे मोठे मोठे राष्ट्रभक्त झाले, त्यांनी राष्ट्रासाठीं कष्ट केले, प्रसंगी राष्ट्रासाठीं प्राणही दिले, पण ते गेले ह्मणून राष्ट्र थोडेच बुडालें आहे! समुद्राच्या भागावर जहाजें खेळतात, वादळात सापडून तुकडे तुकडे होऊन बुडून जातात. ह्मणून त्याचा कधी या समुद्रानें हिशेब दिला आहे? बुडतांना काय पाण्यांत थोडीशी खळबळ दिसेल तेवढीच! वरचा जिन्नस तळाशीं पोचला कीं झाला लाटांचा नेहमीचा व्यवहार सुरू.

**काका**—मग काय? आपलें ह्मणणें भक्तासाठीं देवानेंही प्राण द्यावा? पुढाऱ्याबरोबर जनतेनेंही आत्मयज्ञ करावा.

**उमा**—हो; भक्तासाठी देव धावून येतो—

**काका**—तो देवळातला नव्हे!

**उमा**—हो हो, देवळांतच देव मनुष्यरुप घेतो.

**काका**—ठीक आहे चालू द्या.

**उमा**—चालायचं काय त्यांत! तसें माझें म्हणणें लोकांनींही पुढाऱ्याच्या बरोबर असावें. म्हणजे माणसाला तितकाच हुरूप येतो.

**काका**—ज्याला आपण विरोध केला तीच गोष्ट आपण आतां प्रतिपादन करूं लागला. असेंच होते तें लोक पुढाऱ्या बरोबर पुढारी लोकांबरोबर असा परस्पर संबंध असला तरच तो योग्य. ज्याच्या मागून लोक जात नाहींत तो पुढारी कसला? हरलांत आपण राणीसाहेब! देवळांतल्या देवापेक्षां लोकांसाठीं केलेली कोणतीही गोष्ट त्यांना पटलीकीं लगेच तुमच्या कृतीला लोकप्रिय असें नांव मिळतें.

**उमा**—वाटेल तें म्हणावें. घरदार सोडून, बायकापोरांना तोडून लोकांना जोडण्यासारखें मला कांहीं विशेष दिसत नाहीं त्यांत.

**काका**—आलें कीर्तन मूळपदावर? थांब माळ बुक्का आणतो.

[पडद्यांत-काका साहेब, अहो काका साहेब, आहांत का घरी?]

(सावळाराम व बाळकोबा प्र.क. त्यांस) या सावळारामबापू जरा उशीर केलास बुवा. कीर्तनाच्या पूर्वे रंगांत मोठी बहार आलीहो! आतां आल्यानि कसकस होतें तें पहायचें.

**उमा**—हो हो, पहाल तर? दुसऱ्याचे छळावाद पहायला आपले काय

जायचे आहे ? हे आले आसतीलना आपले अभिनंदन करायला ? मी म्हणतें नुसतें तोंडीं अभिनंदन कां करतां ? इकडून वकीली सोडून घरावर तुळशीपत्र ठेवयाचं झालं म्हणून गांवात पेढे वाटां, लोकांचें काय वाकडें होतें आमचा खेळ-खंडोबा करायला !

बाळः—( सावळास एकीकडे ) बापू पळा ! आल्या पावलीं परत चला कसें. या पहिल्या सरवत्तीलाच आपण चीत झालों.

काका—अशी रागावू नकोस. शेजारी पाजारी ओळखीचीं असलीं म्हणजे कां ! त्यांच्यापुढें आपली माणुसकीसुद्धां बाजूला ठेवून भकत सुटायचें ! ते आले आहेत त्याना या बसा म्हणण्या पुरतासुद्धा शिष्टाचार पाळयाचा नाहीं हें काय ! बसा हो बापू, या बाळकोबा, तुम्ही उभे कां ? आमच्या इथलें हें वादळ होईल लवकरच शांत.

सावळा—काकू तुम्ही आमच्यावर मात्र उगीच रागवलां, काकांनीं वकीली सोडून असहकारीतेचा म.गं पत्करला या बाबतींतच आम्ही त्यांच्याशीं बोलायला आलों हें खरें. पण तें याचें अभिनंदनपर नसून त्यांच्या उलट असेंच आहे. काकांची आम्ही स्तुति करणार नसून त्यांच्या तोंडावर त्यांची भरपूर निंदा करणार आहों.

उमा—होय कां ! मग मी उगीच वडवडले हो ! करा ? तुम्हीं तरी जरा कान उघाडणी करा स्वारींची, अन स्पष्ट विचारा, म्हणावें बायको पोर जिवंतपणी मारुन टाकून अशा रीतीनें संन्यास घेणार कीं काय ? तुम्ही अगदीं भीड धरू नका, थांबा अं, आंता अधण आलें असेल पाण्याला थोडा चहा करून आणतें.

काका—हां ! आपल्या घरचा चहा बंद आहे. कोणी मंडळीं आली तर शिष्टाचाराला नुसतें पाणी आणि गुळाचा खडा !

उमा—तें स्वतःपुरतें पहायचें होतें, माझ्या घरांत मी मुखत्यार आहे. मीहीं चहा घेणार आणि या मंडळींनांही देणार ?

काका—पण हें तत्वाला सोडून होतें आहे.

उमा—तत्वाला सोडून कां खोडून-मोडूनच मी हें करणार !

काका—मोठी पंचाईत आली ! तुम्ही सगळे चहा घेणार ! मग मीच काय पाप केलं आहे. मला ही येऊं दे पण फार नका अं.

उमा—छे ! छे ! एकच प्याला ! हें सगळें असेंच असेल तर चालू दे खुशाल.

[ जाते. ]



लीलाः— दादा! काकांनी वकिली सोडली! [अंक १ ला, प्रवेश १ ला

बाळ०— बापू, आतां करा कीं सुरवात हलके हलके.

सावळा— तुम्हीच कां करांना! मी आपला पाठिंबा द्यायला मागें राहतों.

बाळ०—छे! आपल्याला नाहीं जुळायचें तें. तुम्हीच पुढें व्हा. गुरू मागून शिष्य!

सावळा—आणि प्रसादाच्या वेळेला मात्र शिष्य पुढें होणार काय! वा! वा!! खाशी युक्ति!

काका— कसली कुजबूज चालली आहे, बाळकोबा? माझी समजूत होती कीं, तुम्ही बाकीच्या मंडळीप्रमाणेंच चालू गोष्टींबद्दल बोलायला आला असाल, पण आतां तर तुम्ही माझ्यावरच हल्ला चढवायाच्या इरादानें आल्याचें म्हणाला! तें आपले नुसतें बायकांच्या समजुतीप्रमाणेंच बोलणें होतें ना?

सावळा—तसेंच कांहीं केवळ नाहीं तें. आम्ही आलों होतों-बोला बाळाकोबा.

बाळ०—मी कशाला? तुम्हीच सांगा कीं.

काका—सावळाराम, अरे आपल्या माणसांत इतका संकोच कशाला? मी तसा कांहीं कुणी परका आहे कां?

सावळा—नाहीं; परकेपणाचा प्रश्नच नाहीं. आम्ही आलों, म्हटलें तुमचें या बाबतींत खरें मत काय आहे तें पहावें, अन् मग पुढें बोलावें.

काका—कोणत्या बाबतींत म्हणतां! मी आतां चहाबद्दल जरा चेष्टा केली म्हणून संशय आला कीं काय तुम्हांला?

सावळा—हो, तेंहीं झालेंच एक लहानसें कारण! तुमचें या चळवळीसंबंधीं काय मत आहे? तुम्ही वकीली सोडून कृतीनें जरी नानकोऑपरेशनला संमति दिली तरी तुमची मति काय सांगते?

काका—तें मी का निराळें सांगायला पाहिजे? लोकमान्यांच्या पश्चात् राष्ट्रपुरुषानें महात्माजींच्या देहांत आपला आवेश घातला. लोकमान्यांची विशेष मागणी लोकांकडे नव्हतीच मुळीं, त्यांनीं स्वतः देह झिजवून लोकांत जागृति उत्पन्न केली, त्या जागृतीची पुढली पायरी म्हणजे प्रत्यक्ष कृति! तीच करून दाखवायला महात्माजी सांगत आहेत. कृति केली तर लोकमान्यांनीं लोकांना जागें केलें हें खरें ठरणार. कृतींत कुचराई झाली तर तुम्ही अजून पुरतेपणीं जागे झाला नाहीं असें म्हणावें लागेल. असा हा डायलेमा आहे.

बाळ०—बापू, डायलेमा हें काय हो बंड आहे?

सावळा—हें बोलणें तत्वाच्या दृष्टीनें ठीक झालें. पण अजून त्याची कृति दिसत नाहीं. म्हणूनच महाराष्ट्रावर महात्माजींचा राग आहे.

काका—हो, राग नसला तरी निदान तसा तो भासविण्याचा तुम्ही प्रयत्न करतां आहां खरें, मला एक कळतें, जोंपर्यंत सर्वांचें ध्येय एक आहे, तोंपर्यंत प्रयत्नाची दिशा निराळी असली तरी, ते सगळे पंथ एकच आहेत. मात्र त्यांत खोटेपणाची खडीसाखर खपायची नाहीं. कौन्सिलांत जाऊन मिनिस्टर होण्यानेंच खरेंखुरें कल्याण व्हायचें आहे. अशी जर प्रामाणिक समजूत असेल तर आमच्या मार्गाला सोडून तुम्ही खुशाल कोऑपरेशन करा. तुमचा प्रामाणिकपणा जर खरा असेल, तुम्ही जर थैल्यांच्या आशेनें खरोखरच गेलेले नसाल, तर त्या जागेवरच्या कामाचा फोलपणा तुम्हांला पटल्याबरोबर तुम्ही परत फिराल. सावळाराम, हें अनुभवाचें थरमामीटर तुम्हांला बरोबर वाटेला आणून अक्कल शिकवील.

बाळ०—(स्वगत) थरमामीटर!—आणखी काय येणार याच्यापुढें?

सावळा—तसल्याच प्रकारची ट्रायल तुम्हीही एकदां द्यावी, असें माझें म्हणणें आहे. तूर्त मोठमोठ्या जागा आपल्या लोकांना देण्याची सरकारची पॉलिसी आहे. अधिकार हातांत वागवून लोकांचें पुष्कळ कल्याण करतां येतें.

काका—मग आतां काय, एकाद्या मुनसफीचा ॲप्लिकेशन करूं म्हणतां?

[लीला येऊन उभी राहते]

बाळ०—(स्वगत) थरमामीटर—ॲप्लिकेशन—आज बरेच मोठमोठे इंग्रजी शब्द पदरांत पडणार.

सावळा—छे छे! तसें नाहीं माझें म्हणणें. मी तुमच्याकडे एका मोठ्या जागेची ऑफर आणली आहे. सरकारी वकील होण्याची तुमची तयारी आहे कां? दोन तीनशेंचा स्टार्ट!—पुढें सपाटून पगार वाढेल!—शिवाय तुमच्या स्वातंत्र्यालाही कांहीं बाध नाहीं. तेव्हां, बोला—

बाळ०—हो बोला आतां—कांहीं बाध नाहीं—बोला आतां!

लीला—मी बोलतें त्यांच्याबद्दल. एकदां लोकांची सरकार पुढली वकीली सोडली, आतां काका सरकारची वकीली पत्करणार नाहींत. ते लोकांच्या तर्फेची वकीली लोकांच्या कोर्टांत लोकांपुढें करणार. दोन तीनशें रुपयांच्या

आशेनेंच गेल्या दोन तीन पिढ्या भाळून गेल्या! श्रीमंत सरकारांनीं दिलेल्या दोन तीनशेंच्या सुग्रास अन्नापेक्षां आमच्या गरीब राष्ट्रानें दिलेल्या दोन तीन रुपयांचीच जाडीभरडी भाकर खाऊन आम्ही तूर्त आपला गुजारा करूं.

**बाळ०**—(एकीकडे) अरे बापरे! बापू हें प्रकरण मोठें जहाल दिसतें! मग आमचें कसें होणार?

**सावळा**—ताई, बोल बोलायला काय, ते कोणीही बोलूं शकतो. पण तसें राहण्याला मन खंबीर लागतें. तेलणीवर रुसून अंधारांत बसल्यानें दुसऱ्याचा काय तोटा होणार.

**बाळ०**—हो, 'ज्याचें त्यानेंच अनहित केलें तेथें कोणाचें काय बा गेलें!' (स्वगत) बोललों दडपून, असें हलकें हलके धारिष्ट अंगांत आणलेंच पाहिजे.

**लीला**—काका, तुम्हीच सांगा यांना स्पष्ट नाहीं म्हणून! स्वतंत्रतेची सुखा वकीली सोडली ती कांहीं परतंत्रतेची चाकरी पतकरण्यासाठीं? दिवसें दिवस पुढें जायचें कीं मागें पडायचें? तें कांहीं नाहीं, काका, म्हणा तुम्ही नाहीं म्हणून! म्हणतां ना?

**काका**—बाळ असा उतावीळ पणा करून चालायचें नाहीं मला जरा विचार करूं दे—

**लीला**—विचार काय करायचा आहे इथें? विचारानेंच सगळा घोटाळा होतो. कोणतेंही महत्त्वाचें कार्य व्हायचें असेल, तर तें मनुष्य किंवा राष्ट्र विकार-वश असतांनाच होऊन जातें. ही विचाराविकारांची फूट म्हणजेच देशांतली जहाल मवाळांची दुफळी! नेमस्त लोक 'आस्ते कदम,' असें राजकारणांत म्हणतात, ते धर्मांत भराभर उड्या मारतात, जहाल मंडळी राजकारणाची मजल गाठायची गडबड करतात आणि धर्माचें, समाजाचें सावकास पाहूं म्हणतात, असें परवां वेणुताई एका बायकाच्या सभेंत म्हणाली.

**बाळ०**—(एकीकडे) बापू, हें तुमच्या इथलें प्रकरण! दोघींचा एकच पंथ दिसतो आहे.

**काका**—लीलाताई तूं जहाल मवाळांचा भेद सांगितलास, पण मी त्या दोन्हींपेक्षांही निराळ्या मताचा मनुष्य आहे.

**लीला**—मनुष्य आहांत ना? झालें तर मग, मनुष्याच्या माणुसकीला शोभेल असें वागा म्हणजे झालें.

सावळा—ताई, प्रत्यक्ष जन्मदात्याला इतकें सडेतोड बोलणें शोभत नाहीं. यांत वडिलांचा उपमर्द होतो.

वाळ०—एकदम माणुसकीवर हल्ला म्हणजें काय? (स्वगत) चाललें धारिष्ठ वाढत! एखादा शद्व कां होईना पण तो रागानें बोलून टाकला! जिते रहो!

काका—लीला माझी लाडकी पोर आहे. संसारांत जिवाचा आधार आहे. ती कसेंही बोलली तरी मला तिचें कौतुकच वाटतें. तिच्यासाठीं मी काय करणार नाहीं? हें हंसरें फूल नेहमीं हंसत रहावें. प्रसन्न मुखानें जगाकडे पहाणारी, ही उमलत असलेली माझ्या प्रपंचांतली कळी नेहमीं प्रसन्न रहावी, म्हणून मी वाटेल तें करीन. पण बच्चा, मला विचार पडतो, मोह सोडवत नाहीं तो तुझ्याच बद्दल. धंदा सोडला, पैशाची आशा तोडली, आणि एक लोकसेवा जोडली तर तुझ्या सुखाला खो बसेल; भिकारी बापाबरोबर तुलाही भिकारी व्हावें लागेल; तूप साखरेशीं जेवणाऱ्या माझ्या जिवाला त्या जिनसांचें वर्षावर्षांत दर्शनही होणें कठीण होईल, त्याची काय वाट? म्हणून पुनः मन परत फिरतें. पैशावर आशाळभूतपणानें ठरतें आणि खडतर लोकसेवेची कल्पना मनातल्या मनांतच जिरते.

लीला—काका, माझी तुम्हांला इतकी काळजी वाटते! माझ्यासाठीं तुमचा जीव तळमळतो? द्या सोडून तो विचार. गरीबींत रहायला लागलें तरी माझ्या मनाचा उत्साह मुळींच कमी व्हावयाचा नाहीं. देश श्रीमंत व्हावा म्हणून तुम्ही गरीबी पतकरणार त्या तुमच्या निश्चयाच्या आड तुमची लीला कधींच यायची नाहीं. ऐषआरामांत रहायला तुम्हींच शिकविलें, आतां गरिबींतल्या सुखासमाधानांत रहावयाचा धडा तुम्ही घालून द्या. पहा कशी फक्कड वळण गिरवीन तें.

सावळा—वळण गिरविण्याच्या नादांत वळणावळणानें गिरक्या खात पडायची मात्र पाळी येईल!

वाळ०—हो, बोला आतां-पडायाची मात्र पाळी येईल—बोला आतां.

लीला—चढेल तोच पडला तर पडेल! त्यांत काय आहे? एकदां पडलें तर पुन्हां चढण्याचा यत्न करावा, प्रयत्नांतीच परमेश्वर भेटत असतो.

सावळा—हेंहि आमच्या वेणूताईच म्हणत असतील, पण पहिल्या पडण्यांतच पाय मोडला तर?

वाळ०—हो, तर कसें? बोला आतां? [उमाबाई चहाचे पेले घे. प्र. क.]

**लीला**—हें काय? आमच्या घरांत चहा! काकांच्या इथें कुणीही चहा घ्यायचा नाहीं. दे तो चहा फेकून! [ उमाबाईच्या हाताशीं झोंबू लागते. ]

**उमा**—अग कारटे, असं काय पिसाटल्यासारखी करते आहेस ती? कप फुटतील ना?

**सावळा**—( एकीकडे ) बाळक्या, पळ! ( उघड ) बरें आहे येतों आम्ही!

[ जाऊं लागतात ]

**काका**—थांबा, चहा घेतां ना! ताई, थांब जरा. मंडळी आली आहेत, बरें दिसत नाहीं!

**उमा**—तिला कुठें त्याची लाज आहे! चल बाजूला! माझा हात सोड. चहा सांडेल!

**काका**—ताई, ऐक एवढें. हें काय?

**लीला**—( चहा लवंडून देऊन ) हे चहाचें पिकेटिंग!

[ पडदा पडतो. ]

### प्रवेश दुसरा समाप्त.

---

### प्रवेश तिसरा.

[ घरापुढील रस्ता, सावळाराम व बाळकोबा प्र. क. ]

**सावळा**—कां कशी उडाली गंमत?

**बाळ०**—अहो गंमत कसली घेऊन बसलां अहांत राव? मला वाटलें आपलाही समाचार घेणार ती पोर; ह्मणून तुम्ही 'प' चा उच्चार करून ळा पर्यंत पोचायच्या आंत मी आपला दरवाजा गाठला! मनांत आलें होतें क्षणभर, कीं ती उद्यां मला पळपुटया म्हणेल, पण ह्मटलें जाऊंद्या, उद्याचें उद्या पाहून घेऊं. तूर्त आपले धड अंगानें बाहेर पडा कसे.

**सावळा**—म्हणजे कां तुम्हांला कोणी मारायला आलें होतें? तुम्ही भारीच भित्रे बुवा! अहो नुसत्या या पहिल्या प्रसंगांत जर तुम्ही परागंदा होण्याची पाळी

आणली, तर पुढें परिचय, प्रणय, परिणय-या संसाराच्या पायऱ्या तुम्ही चढणार कसे?

बाळ०—तसा कांहीं मी स्वभावानें भित्रा नाहीं; पण पहिल्याच भेटीला मनुष्य सहजच थोडासा नर्व्हस् होत नाहीं कां! हलके हलके ॲप्लीकेशन येऊन थरमामीटर जुळलें म्हणजे डायलेमा सहज लागेल.

सावळा—अरे बापरे, काय हा इंग्रजीचा मारा! अहो पण कोणत्या अर्थानें कोणता शद्ब वापरतां आहां! मला तर तुमच्या या वाक्याचा कांहींच बोध होत नाहीं बुवा.

बाळ०—मोठेंच आश्चर्य आहे! पण मी शद्बा बरोबर लक्ष्यांत ठेवले होते हो!

सावळा—शद्ब बरोबर असतील; पण त्यांच्या अर्थाची काय व्यवस्था! तुमच्या बोलण्यांत मला तर सगळा अनर्थ दिसतो आहे. एकदां आपल्या या सूत्रावर आपलेंच भाष्य होऊन जगावर प्रकाश पडूं द्या!

बाळ०—अप्लिकेशन म्हणजे अनुभव येऊन थरमामीटर म्हणजे प्रेम जुळलें कीं डायलेमा म्हणजे लग्न सहज लागेल! ( सावळा. हंसतो ) कां, हंसता हो फारसे? माझा अर्थ चुकला कीं काय कुठें? एखादा शद्ब नसेल बरोबर—

सावळा—एखादा कां कोणताच शद्ब बरोबर नाहीं. निदान हल्लींच्या भाषेंत तरी त्या शद्बांचा आपण ह्मणतां तसा अर्थ होत नाहीं. मग आपण तरी कोणत्या आधारावर हा अर्थ बसविला सांगा पाहूं?

बाळ०—मी आपला तर्कानें ठरविला अर्थ! मला काय माहीत, हें इतकें कठिण शास्त्र आहे तें.

सावळा—आपण आहांच तसे भाषाशास्त्रकोविद! उद्यां या नवीन अर्थ-पद्धतीवर एखादा निबंध लिहून द्या पाठवून अमेरिकेला अन् व्हा डॉक्टर!

बाळ०—बापू, खरेंच तसा एक प्रयत्न करून पाहूं या, पण काय हो डॉक्टर झालों, अन् एखादा रोगी आला, 'द्या औषध' म्हणून, तर मग?

सावळा—पुढलें पुढें पाहतां येईल सावकास! तूर्त आपला हा रस्त्यावरला सीन संपवून गृहप्रवेश करूं.

बाळ०—गृहप्रवेश? बापु वधूच्या पदराला उपरण्याची गांठ मारून तिला मागून ओढीत ओढीत, आजू बाजूच्या मंडळीकडे मोठ्या विजयी मुद्रेनें पहात लग्नानंतरचा खराखुरा गृहप्रवेश करण्याचा बाळकोबाच्या आयुष्यांतील या

भाग्याचा प्रसंग तुम्हीं केव्हां हो आणणार! आहाहा! त्यावेळीं मंडवळ्यांच्या माळापुढें लोंबत असतां खाली लवलेल्या स्थितींतच माझी ती वधू माझ्याकडे कशी चोरून चोरून पाहील, बाकीची मंडळी कशी चेष्टा करतील, एक का दोन, तीं सगळीं चित्रें सिनेमाच्या फिल्मसारखीं माझ्या डोळ्यांपुढून यावेळीं जात आहेत.

**सावळा**—जात आहेत ना? मग घालवा एकदां पुरतीं तीं सगळीं चित्रें, आणि जरा स्वस्थ होऊन आंत चला, म्हणजे तुम्हांला सांगतों कांहीं युक्ति सुचली तर! [त्याला घेऊन जातो. घराचा आंतील भाग]

**सावळा**—आलें का नीट ध्यानांत? तेव्हां आतां हा असा डाव टाकला पाहिजे.

**बाळ०**—तें काम आपलें. तुम्ही सांगते व्हां, कीं कामगिरी उठलीच म्हणून समजा.

**सावळा**—मग आतां उशीर नको. उद्यांलाच मीटिंग ठरली आहे. टाका बार उडवूनी काय!

**बाळ०**—हो हो, त्याला काय हो हरकत आहे? बंदूक भरून तोंडा पेटवून द्या माझ्या हातांत, कीं पहा कसा बार उडतो तो. काकांनीं तिथल्या तिथेंच गार पडलें पाहिजे.

**सावळा**—हं, शुभस्य शीघ्रम्! आतांच होऊं द्या तालमीला सुरवात.

**बाळ०**—पण आधीं नक्कल उतरून घेऊन पाठ तरी करूं द्या. नक्कल पाठ नाहीं, अन् तशीच तालीम घ्यायला लागलां तर माझें तुम्हांला समजायचें नाहीं, तुमचें माझ्या लक्षांत यायचें नाहीं; सगळा घोटाळा उडेल म्हणून म्हणतों बोला आतां.

**सावळा**—अहो घोटाळा उडायला काय झालें! लेक्चर द्यायचें त्याला कशाला एवढी तयारी पाहिजे? सहज जातां जातां बोलून जायचें. तुम्ही केवढें अवडंबर माजविलें त्याचें?

**बाळ०**—असें जातां जातां बोलून नाहीं चालायचें. लेक्चर म्हणजे तें लेक्चरच व्हायला पाहिजे. बरोबर हातवारे, पोझिशन, भाषणाचें टोनिंग सगळें कांहीं असें बनलें पाहिजे कीं यंव! तेव्हां तुम्ही आधीं लिहून काढा, मी करतों; अन् मग त्यांतल्या खाचाखोचा द्या सांगून, कीं झालें काम. बोला -

सावळा—कांहीं नको लिहायला. माझें ऐका तुम्ही. आतां अशी कल्पनां करा कीं तुम्ही स्टेजवर ऑडिअन्सपुढें उभे आहां.

बाळ०—ठीक आहे, केली कल्पना. पण पोझिशन कोणती! टेबल खुर्चीच्या मधल्या दामटींत अडचणीनें उभें राहून, दोन हात टेबलावर टेकून आणि बगळ्यासारखी मान अशी पुढें काढून कपाळाला आठ्या चढवून बोलायचें, कीं, मोकळ्या आंगानें टेबलाच्या एका बाजूला उभें राहून हाताची एक मूठ टेबलावर अलग टेकून हंसत हंसत बोलायला सुरवात करायची! म्हणजे उद्यांच्या काकांच्या अभिनंदनाचा हा प्रसंग दुःखाचा कीं आनंदाचा? दुःखाचा असला तर व्याख्यात्याच्या आणि अध्यक्षांच्या मध्येंच जोड दिल्यासारखा उभा राहून बोलेन.

सावळा—तुम्ही उद्यांच्या आपल्या भाषणानें काकांना अगदीं खूष केलें पाहिजे. तुमची बोलण्याची ढब आणि एकंदर ऐट पाहून काकाला वाटावें कीं वस्स! आपल्या लीलेला जावई—नव्हे नवरा—असावा तर हाच!

बाळ०—बरें, मग मी आपला हसत टेबलाच्या बाजूलाच उभा राहीन. पण पुढें सुरवात कशी करायची? इंग्रजी शब्द असले तर आपले नीट शिकवून ठेवा मला. नाहीं तर मघासारखा प्रकार व्हायचा. तेव्हां—बोला आतां!

सावळा—छे! छे! इंग्रजीचें एक अक्षरही बोलायचें नाहीं. तुम्ही इंग्रजीच्या बाबतींत अर्धवट आहां हें तूर्त तुमच्या पथ्यावरच आहे. सरळ मराठींत सुरवात करायची. 'प्रिय बंधु भगिनींनो—

बाळ०—आणि तिथें भगिनी नसल्याच तर?

सावळा—मग नुसतें 'बंधुजनहो किंवा बांधवहो—

बाळ०—आणि बोलतां बोलतां मध्येंच स्त्रिया आल्या तर? पहिलें संबोधन गेलें कां फुकट? किंवा आरंभीं तेथें ती एकटीच असली तर?

सावळा—ती कोण बुवा!

बाळ०—ती बुवा नव्हे, ती काकांची लीला—ती आपल्या बापाचा गौरव पहायला यायचीच! तिला कां भगिनी म्हणूं म्हणतां! त्यापेक्षां सोडानांत हा आरंभींचा भाग? एकदम भाषणाला सुरवात!

सावळा—बरें तसें कां होईना! तशीही चाल आहे. मग असें—'मी आज जो आपल्या पुढें उभा राहिलों आहे,! किंवा 'मी जें कांहीं आतां बोलणार आहे.



लीलाः—हे चहाचं पिकेटिंग! अंक १ ला, प्रवेश २ रा.

**बाळ०**—थांबा—मला नीट लक्ष्यांत घेऊं द्या. मी म्हणजे इथें छातीवर हात ठेवायचा ना? आतां आज! त्याचा हावभाव कसा करायचा?

**सावळा**—अहो प्रत्येक शद्बाला कसला हावभाव करणार!

**बाळ०**—तसें नाहीं उपयोगी! गोष्ट करायची म्हणजे ती यथासांग केली पाहिजे. तसाच अवाज प्रथम हलकाच ठेवायचा ना?

**सावळा**—हो. नाहीं तर इतका हलका ठेवाल कीं ' लाउडली प्लीज् ' या लोकांच्या ओरडण्यांतच नर्व्हस होऊन जाल.

**बाळ०**—त्यापेक्षां मंत्रपुष्प म्हणणाऱ्या ब्राह्मणांचा 'सभासद इति' त्या वेळचा आवाज आरंभालाच काढला तर?

**सावळा**—त्यापेक्षां असेंच करा, म्हणजे विशेष त्रास न पडतां काम होईल. "आपण शांतपणानें माझें भाषण ऐकून घ्याल तर दूरवर सर्वांना माझें बोलणें सहज ऐकूं जाणार आहे,"

**सगुणा**—(प्र. क.) कसलें बोलणें, सांवळाराम? काय शिक्षण देतो आहेस बाळकोबाला?

**सावळा**—ये आक्का! काय चाललें आहे म्हणतेस। ये तो लेक्चरबाजी चल रही है! हं बाळकोबा मारा घोक्या आतां या पाहिल्या सूत्राचा. बैस आक्का. दादा कुठें आहेत!

**सगुणा**—बाहेर फिरायला जायचें झालें आहे. आणि तूं रे बरा आज घरींच?

**बाळ०**—छे, आह्मी आतां हेंच बाहेरून आलों ना! (पाठ करतो) आपण शांत पणानें-तसें नव्हे-आपण म्हणजे तुम्ही, नाहीं कां? तेव्हां लोकांकडे हात न्यायचा! अन् शांतपणाला मला वाटते दोन्ही हात 'हे स्वर्गस्थ देवांनो', खारखे वर न्यावेत, कीं 'नांदा सौख्यभरें' यासारखी आशीर्वादाची पोझिशन बरी! दोन्ही प्रकारचे हातवारे करून) आपण शांतपणानें माझें भाषण—

**सगुणा**—मग बाहेर गेला होतास, तर मी सांगितल्याचें काय केलेंस सावळाराम?

**सावळा**—कशाचें ह्मणालीस आक्का? माझ्या अगदींच लक्षांत राहिलें नाहीं.

**सगुणा**—कशाला राहील! तुह्माला पाहिजे आहे कुठें तें! तरी मी तुझ्या-जवळ पैसे देऊन ठेवले होते.

सावळा—ते पैसे—आक्का—अं—

सगुणा—केले असतील कोणत्या तरी चैनीला खर्च. होय ना ? सावळाराम तुला नीट कळूं लागणार तरी केव्हां ?

बाळ०—आक्का, रागावूं नका. अहो या वयांत चार पैसे इकडे तिकडे खर्च व्हावयाचेच.

सगुणा—पण तितकी आमची श्रीमंती कुठें आहे ? नोकरी चाकरीवर प्रपंच करणाऱ्याला कितीही मोठा पगार मिळाला तरी तो पुरवठणाला पडत नाहीं ! हें काय बरें सावळाराम ? तूं असा वागतोस कीं नाहीं तें मला मुळींच आवडत नाहीं.

सावळा—आक्का, मी तुझे पैसे कोणत्या कामाला खर्च केले हें आजच सांगत नाहीं. पण तुझ्या चरक्यावद्दल मात्र—

सगुणा—त्याच्या विरुद्ध जर तुला व्याख्यान द्यायचें असेल तर तें खुशाल स्वारी आली म्हणजे जवळ दे जा. मी आज तुला इतके दिवस दातांच्या कण्या करून सांगतें आहे, पण तुला कांहीं एवढं काम होत नाहीं.

बाळ०—आक्का, मी करतों तुमचें काम. मला पैसें न देतांच करतों. म्हणजे मग झालें कीं नाहीं ? ( पाठ करतो ) भाषण ऐकून घ्याल-वापू घ्याल या शब्दाला हाताची ओंजळ करावी कां ? घेणें या अर्थी मला वाटते तेंच बरें दिसेल.

सावळा—ओंजळ भिक्षा मागतांना करायची असते. आक्का तूं माझ्यावर रागावलीस तर खुशाल रागाव बापडी. वडिलांच्या शिव्या त्या आम्हांला ओव्याच होतात. पण चरक्याचें मी मुद्दामच टाळतों आहे. मला वाटतें दादांना हें मुळींच पसंत पडणार नाहीं.

सगुणा—काय झालें पसंत न पडायला ? घरच्या घरीं बसून आम्ही कांहीं उद्योग केला, तर त्यांत पुरुषांना कां वाईट वाटावें ? तूं आपली उगीच कांहीं तरी बात सांगतो आहेस झालें.

बाळ०—हें खोटें नाहीं आक्का. चरक्याच्याविरुद्ध पुष्कळ लोक आहेत. खुद्द मला चरक्याची चळवळ पसंत नाहीं ना !

सगुणा—चरक्याच्या सुताची ओबड धोबड खादी आंगाला टोंचेल, श्रीमंतीच्या आरामांत लोण्यासारखीं मऊ झालेलीं तुमचीं इंद्रियें. त्यांना हा काटक-

पणा सोसावयाचा नाहीं! पण शरीर मऊ करून मन कठोर ठेवलेंत, त्यापेक्षां देहाला काटक बनवून मन जर मऊ कराल तर, बापूसाहेब, फार चांगलें होईल. ठीक आहे. तुम्ही मला आणून देत नाहीं तर मी स्वतः घेऊन येतें तो चरका—

**त्रिंबक**—(प्र. क.) कसला चरका? काय गडबड आहे ही? निघालां कुठें आपण?

**बाळ०**—(स्वगत) दादांची स्वारी आली! आतां आपली तालीम तिकडल्या दालनांत जाऊनच करावी हें बरें. कुणाचें लक्ष्य नाहीं तंवर आपलें यःपलायते—

[जातो]

**त्रिंबक**—कां, सगळे गप बसलां? सावळाराम, काय चाललें होतें—चरक्याचें पुराण?

**सगुणा**—पुराणाची आवड बायकांना असते, तिकडे पुरुषांनीं कशाला लक्ष द्यावें?

**त्रिंबक**—पण हें चरक्याचें पुराण सगळ्याच प्राण्यांना चरका लावणारें आहे. आणि म्हणूनच तें मला नको आहे. चरक्याचें सूत—खादी—किती खेडवळ गोष्टी आहेत या!

**सगुणा**—मग मलाही तेवढयापुरती खेडवळ समजायची होती, म्हणजे झालें!

**त्रिंबक**—तेवढया पुरती खेडवळ, एवढया पुरती वेडगळ—ही ॲनॅलिटिकल जॉमेट्री आपल्याला नाहीं बुवा येत. अस्सें! एकंदरींत आपल्याही डोक्यांत हें वेड शिरलें म्हणायचें!

**सगुणा**—सगळ्या जनतेच्या मनांत जर ही आत्मोन्नतीची ईश्वरी प्रेरणा झाली आहे, तर त्यांतून मी एकटीच कशी राहीन बाजूला!

**त्रिंबक**—ईश्वरी प्रेरणा! डॅम् इट्! सगळा वेडयांचा बाजार आहे झालें! अन् सावळा, तूं कसा स्वस्थ बसलास! तुझ्या वहिणीचें मन वळविण्याचा कांहींच यत्न केला नाहींस तो?

**सावळा**—दादा, माझ्याकडून मी सांगून पाहिलें—म्हटलं दादांना आवडायचें नाहीं—पण ती ऐकेल तर ना पुढें बोलायचें? वडील माणसांना आपण तरी जास्त जोरानें कसें बोलायचें?

त्रिंबक—अन् बोलून तरी काय उपयोग व्हायचा आहे ! आतां आम्ही सारखे बोलतों आहोंचना ? पण सगळें पालथ्या घागरीवर पाणी.

सगुणा—असा त्रास करून घेऊं नये. या आमच्या करण्यांत कांहीं गैर आहे असें वाटत नाहीं.

त्रिंबक—वाटेल कशाला ! बाहेरली हवाल पुरतेपणीं लक्षांत घेऊन दोन्ही बाजूंचा नीट विचार कराल तेव्हांना तुम्हांला कळणार गैर कीं रास्त आहे तें ? पण इतका धीर आहे कोणाला ! तो वसंत रिकामा हिंडतो, ताईलाही दुसरा तूर्त उद्योग नाहीं, दोघे घेऊन कांहीं तरी बरळत असतील, आपल्यालाही तें पटलें असेल; झालें एकदां आपल्याला कांहीं पटलें कीं मग त्याबद्दल कंठशोष करून दुसऱ्याचें रक्त आटलें, तरी शेवटीं हटलें तर आह्मींच हटलें पाहिजे ! जिकडे पहावें तिकडे हें दिसतें आहे, ऐकायला गेलें तरी हेंचं कानावर येत आहे. जो उठतो तो आपला कळकळून म्हणतो आहे कीं "या हो, मला एक चरका आणून द्या—

वसंत—( चरका घेऊन प्र. क. ) हा घ्या चरका ! पण दादा तुह्मी कसे एकदम इतके वळलां ! कां वहिनीनें छाप पाडली तुमच्यावर ? एकूण तुम्हीहीं फावल्या वेळांत चरका फिरवणार तर ? वा ! वा ! ! दादा खरोखर मला अतिशय आनंद झाला आहे. श्रीमंत, गरीब, नोकर, व्यापारी प्रत्येकजण पोटासाठीं ,, " तरी खुशाल मजेखातरसुद्धां जेव्हां हा चरका फिरवितांना दिसेल त्या दिवशीं महात्माजींची कार्यसिद्धि होऊन हिंदुस्थानावर सोन्याचा दिवस उगवेल. अहाहा ! तुम्ही आज हें मनांत आणलें—धन्य चरका—धन्य महात्मा-बोला महात्मा गांधीजीकी जय !

त्रिंबक—शट अप् यू फूल ! इतके हुरळून जायला तुला झालें काय ? तो तुझा चरका, आणि त्या सांप्रदायाचे तुम्ही अनुयायी, वाटेल तो गोंधळ घालीत बसा. मला तुमच्याशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. ह्मणे चरक्यांत स्वराज्य ! या महात्माजीला कोणी 'मॅड् मुल्ला' म्हणतात तचें खरें. चरक्यांत कसलें स्वराज्य यायचें ! उद्यां हे म्हणतील चुलींत स्वराज्य आहे, पॉकेट लँप सारखे खिशांत-स्वराज्य बसलें आहे. ( वेणु व लीला प्र. करतात. ) या ताईसाहेब, दिसतें आहे, आपण दोघांनींही हें चरक्याचें स्वराज्य हातांतून आणलेलें दिसतें आहे. पण ताईसाहेब हें कापसाचें विरविरीत फुसकें स्वराज्य वाऱ्याची सहज झुळुक

आली तरी त्यासरशी वर आभाळांत उडून जाईल अन् मग ते मोकळे हात "पुन्हा स्वराज्य !" म्हणून ओरडा करतांना तुम्हाला तोंडावर घ्यावेसे वाटतील!

**सगुणा**—स्वराज्याची अशी थट्टा होण्याइतकी आमची स्थिति दीन झाली काय ?

**वेणू**—दादा, चरक्यांतलें स्वराज्य तुम्हाला दिसत नाहीं म्हणून ज्यांना तें दिसतें त्यांचें म्हणणेंच खोटें असें म्हणून हेटाळणी करणें बरें नव्हे. मोठ्या माणसांच्या उच्च कल्पना सामान्य माणसांना कळत नाहींत, म्हणूनच श्रद्धा ठेवून ते सांगतील तसें जगानें वागावें, म्हणजे त्यांत सर्वांचेच कल्याण होतें. चरक्यांतलें स्वराज्य दिसण्याइतकी आमची दृष्टि तीक्ष्ण झाली नाहीं, हा दोष दादा आमचाच नव्हे कां ?

**लीला**—ताई अशा न दिसणाऱ्या मंडळीकरितां आपण आपल्या चरक्यावर 'स्वराज्य' हीं अक्षरें खोदून घेऊं म्हणजे झालें. मग तरी दिसेल ना त्यांना चरक्याचें स्वराज्य ?

**वसंत**—वा वा ! फक्कड कल्पना ! खाशी तोड ! कां दादा, आतां कसें काय ?

**सावळा**—( स्वगत ) या चरक्यांत सापडून दादा लागले गिरक्या खायला. तेव्हां हें स्वराज्य थंड होईपर्यंत आपण जरा बाळकोबाचा समाचार घेऊन येऊं. [ जातो ]

**वसंत**—कां दादा, दाखवूं कां चरक्यांतलें स्वराज्य ?

**त्रिंबक**—अरे वा, तूं तर मला भीतिच दाखवायला लागलास कीं ! जसें कांहीं स्वराज्य मिळाल्यावर त्यांत आमची कांहीं वाटणीच रहाणार नाहीं !

**वसंत**—हो हो, वाटणी राहील तर ! स्वराज्यांत खालच्या मीनिअल्सची कामें देऊं तुह्मांला ! कां. राग आला ? नाहींतरी तुह्मी हल्लींच्या राज्यांत कोण समजतां स्वतःला ?

**त्रिंबक**—हल्लींच्या राज्यांत आह्मी ऑफिसर्स आहों, पट्टेवाले नव्हे—

**लीला**—तुम्ही ऑफिसर आमच्या पुढें-स्वतःच्या बांधवां पुढें, गरीब रयतें पुढें ! पण साहेबापुढें पट्टेवालेच नाहीं तर काय ?

**वेणू**—दादा, पुढच्या मनोराज्यावर इतक्यांतच गुरकावूं नका. कांहीं झालें तरी तुम्ही आमचे बंधु आहां. हिंदु आहां ! तुम्हांला स्वराज्यछत्राखालीं कसा त्रास होईल ? इतकेंच नव्हे तर उद्यां जर स्वराज्य मिळालें तर आज परके

म्हणून वाटणाऱ्या इंग्रजांना सुद्धां आह्मी आमच्या स्वराज्यांत आपलेसे करून घेऊन प्रेमानें वागायला लावूं? हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, सगळे हिंदवासीच स्वराज्याचे सारखेच हक्कदार आहेत.

**वसंत**—याच्याही थोडें पुढें जाऊन मी असें म्हणतों कीं, माणुसकीच्या सन्मान्य तत्वावर आज आमच्या जगाचे एकचएक विस्तीर्ण स्वराज्य बनवायची जीं खटपट अलीकडे चालली आहे, त्या स्वराज्यांत आफ्रिकेच्या रानटी पशूलासुद्धां पश्चिमेकडल्या अत्यंत सुधारलेल्या माणसांजवळ बसतां येईल.

**त्रिंबक**—ह्मणजे ती एक जंगी सर्कसच तयार करणार म्हणाना! छे बुवा या सगळ्यांचीं टाळकीं खात्रीनें फिरलीं! पण वसंतराव, खूप लक्ष्यांत ठेवा, तूर्त आपला वाचाळपणा चालला आहे हवा तसा, पण 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' बरें! प्रत्यक्ष कामासाठीं हाडें झिजवायची वेळ आली, म्हणजे मग आपला 'नानू' येईल पुढें.

**लीला**—नानू येणार नाहीं किंवा आम्ही काकूलाही हाक मारणार नाहीं.

**वेणू**—'मना चंदनाचे परी त्वां झिजावें' ही त्याच समर्थांची शिकवण त्यावेळीं कुणी विसरणार नाहीं, दादा!

**त्रिंबक**—( सगुणेस ) कां-आपल्यालाही झाला आहे कां हा उपदेश?

**सगुणा**—हो. मला झाला नसला, तरी मी तो हौसेनें करून घेतला आहे.

**त्रिंबक**—( त्रासून ) झालें! माझ्यावर सगळें घर फिरलें! मला चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. [ शिपाई लखोटा देऊन जातो. ]

**त्रिंबक**—( तो तसाच पहातात ) ऑफिसचें लेटर, अन् घरच्या पत्त्यावर! चिन्ह ठीक दिसत नाहीं म्हणायला, आणि पत्र हातांत यायला एकच गांठ पडली आहे! नशीबानें कांहीं पाजीपणा तर नाहीं ना केला?

**वेणू**—असें काय बोलतां दादा? कचेरींतलें कांहीं तरी काम असेल, तुम्हांला उगीचच शंका वाटते?

**त्रिंबक**—त्यांत गैर काय आहे? हल्लींचा कालच तसा आला आहे! बरें पाहूं या तरी साहेब बहादुर काय म्हणतात तें!

[ पत्र फोडून वाचूं लागतो ]—

**सगुणा**—( त्याकडे पहात ) वन्सें, असें काय चाललें आहे तें? वाचतां

वाचतां एकदम राग येतो आहे–तो पहा चेहेरा अगदीं उदास झाला!

**वसंत**—काय आहे दादा त्यामध्यें? ही रागाची चर्या मधून—मधून खेदाचे सुस्कारे?–दादा, पाकिटांत काय लिहिलें आहे?

**त्रिंबक**--माझ्या कपाळांत लिहिलेलें जें मला आजपर्यंत दिसत नव्हतें तें या माणसांच्या हातांनीं लिहून माझ्यापुढें ठेवलें आहे! नोकर माणूस आपल्या कामापुरता धन्याचा तावेदार, ही समजूत खोटी असल्याचें या पाकिटांतून लिहून आलें आहे. ताई, तुरुंगांतला कैदी पायांत बेडया आडकवून घेऊन एकटाच आपला शिक्षा भोगांत असतो? पण नोकरीची बेडी ती भाकरी खाणाऱ्या सगळ्याच्याच पायांत अडकलेली असते. नोकराची जबाबदारी त्याच्या नेमलल्या कामापुरतीच नसून तो आपल्या बायकापोरांच्या इमानाबद्दलही धन्याला जबाबदार असतो, हें तत्व या लेखानें मांडलें आहे. (रागानें) पण हा अन्याय नव्हे का? आमच्या नोकरीचें जूं तुम्ही लादाल तसें आम्ही स्वत:पुरतें खांद्यावर घेतों, आमच्या घरांत मुलांबाळांशीं तुमचा संबंध? (विचारक.) पण-पण हा राग तरी कुणावर करायचा? पटली तर अशा अटीची चाकरी करा, राबवूं तसे राबा, नाहीं तर आपल्या घरचा रस्ता सुधारा! तुम्ही गेलांत म्हणून चाकरी थोडीच रिकामी राहणार! एकाच्या जागीं सवाई ताज्या दमाचे एकशें एक इसम वाटेलत्या खडतर अटी पाळूनसुद्धां हसत चाकरी करायला तयार आहेतच ना? ते तरी काय करणार? पोटाची खांच रोज कसल्या तरी अन्नानें भरली ही पाहिजेच! परमेश्वरा, कसला प्राणघातक पेंच पाडलास हा!

[सचिंत बसतो.—पडदा.]

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला



[ त्रिंबकरावांचें घर—सावळारामाचे विचार चालू— ]

सावळा—वेणू ! वेणू !! ही वेणू अशीच रहाणार कां ? या वेणूला दोन्हां हातांनीं धरून तोंडाच्या प्रेममय श्वासासरशीं तिच्या अंतरंगांतून निघणाऱ्या मंजुळ सुराच्या गानब्रह्मांत स्वतः डुलून वेणूसही खुलविणारा कुणी भाग्यवान् या जगांत राहिलाच नाहीं कां ? तारुण्यांच्या ऐन भरांत ही केवढी कठोर तपस्या! वेणू, तुला तुझ्या भोंवती जगांत काय चाललें आहे, हें दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं. कां दिसून सुद्धां मनावर त्यांतलें कांहीं ठसत नाहीं ! तुझ्या आंगावर शुद्धि आहे, तुझी विचार शक्ति जिवंत आहे, मग विकार कुठें गेला तोच मला पहायचा आहे. पण माझेंही मन भकूं लागलें ? हां, मनातले मानाजीराव, नटि शुद्धीवर या जरा धीरसे ! जरा आस्ते-थोडें शिस्तीनेंच, तुमची गती चालूं दे ! उतावळेपणानें विचारांचा गोंधळ झाला तर त्याची व्यवस्था लावणें माझें मलाच कठीण जाईल. वाळकोबा, आपण व्हाच तूर्त जरा बाजूला. तुमच्या खुळेपणाला शहाणपणाची पुटें चढवून तो जगांत शंभर नंबरी सोनें ह्मणून विकण्याची जरी मला स्वतःला मुळींच आशा नाहीं, तरीं पण खुळसटा, तुला तसा भ्रम आहे; आणि त्या भ्रमांतच माझा फायदा आहे; तर मी तरी कशाला तुझी निराशा करूं ? पण तूर्त माझें डोकें जास्त महत्वाच्या गोष्टी साठीं जरा शांत आणि स्वस्थ व्हायला पाहिजे आहे. तेव्हां राजश्रियाविराजित खुळेश्वर, आपण जरा आमच्या डोक्या‑तून बाहेर चला कसे. भाववंधनांतला व्हिलन् घनःश्याम-व्हिलन कसला तो‑लतिकेनें त्याचा धिःकार केला तेव्हां तेवढ्यापुरता राग येऊन तो व्हिलन बनला. खऱ्या व्हिलनला अपमानाचें कारण लागत नाहीं, त्याच्या मनांत आलेली गोष्ट तो जगाच्या दृष्टीनें, समाजाच्या नीतीनें दुष्ट म्हणून ठरलेल्या मार्गांनीं साध्य करून घेतो. सज्जन हे जसें निष्कारण मित्र तसे व्हिलन् म्हणजे अकारण वैरी. पण—पण—सगळ्या नाटकांतून व्हिलनचा शेवट कांहीं चांगलासा झालेला दिसत नाहीं. एक त्याला पश्चाताप तरी होतो; किंवा आपला हेतु



त्रिंबकः—दिसतंय। तम्ही दोघींनीं हें चरक्याचें स्वराज्य आणलं आहे तें। [अंक १ला, प्रवेश ३ रा.

बांधला नाहीं म्हणून तो आत्महत्या करून घेतो. तसेंच माझेंही होणार कीं काय ? ऊं : ! जाना दे, कुच फिकर नही है. इसकी क्या बडी बात है! ही आमची इष्ककी बात बडी है. पाहूं-पाहूं-व्यवस्थित रीतीनें चहूंकडून मारा करून पाहूं किल्ला कसा पडत नाहीं तो ! ' भोळे अमुचे दादा-' तशी आमची आक्काही साधीच--बाकीची तर काय पोरेंच--या सगळ्या साध्याभोळ्याच्या घोराटकींत लुच्चा थोर काय तो--पण आजच कशाला ही पढाई ! दादांच्या मागें एक पाकीट तर लागलेंच; आतां पुढलें काम चोख करून दाखविलें म्हणजे आपोआपच ठरणार आहे काय तें ! तूर्त या ठिकाणीं स्त्रियांची कॉन्फरन्स उर्फ बायकांचा बाजार भरणार आहे. बायकांचा बाजार-बाजारांत बायका बसतात-या वरूनच बाजारबसवी हा शब्द बनला-पण हा घरगुती बाजार-नुसेंता शो-देवघेवीचा सौदा नाहीं चालायचा इथें. ( पाहून ) बापूसाहेब, गुंडाळा आपला गाशा इथून. मेंबर मंडळी आली ! [ जातो.

[ सगुणाबाई, वेणू, उमाबाई व लीला प्र. क. ]

**वेणू**—मग काय ! पटली कां माझी कल्पना ?

**लीला**—हो हो, मला पुरी पटली—

**उमाबाई**—अग थांब जरा; उगीच पटली पटली काय ! तुझी ज्या त्या गोष्टींत आपली घाईच फार. अगदीं धीर म्हणून कसा तो धरायचाच नाहीं.

**सगुणा**—तुमची हरकत काय ती तरी सांगाल ! वन्सं म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

**उमा**—मी तरी कुठें म्हणते खोटें म्हणून पण—

**लीला**—पुन्हां पण कशालाग आई ! आज काल जगांत काय चाललें आहे तें पाहून आपणहीं नको कां वागायला ?

**उमा**—जगांत चालली आहे लढाई, म्हणून तूंही जा अन् हो एकाद्या तुर्की तोफखान्यावर सेनापति.

**वेणू**—युरोपांतल्या बायकांची गोष्ठ कशाला पाहिजे ? पर्वांच्या महायुद्धांत कांहीं बायका खरोखरच लढत होत्या !

**लीला**—मग आमच्याकडल्या बायका तरी कमी होत्या का ? अहिल्याबाई होळकरणीनें राघोबादादाला पेचांत पकडलें, झांशीच्या लक्ष्मीबाईनें तर इंग्रजांना सुद्धां थोडा वेळ चकित केलें—

उमा—बरें झालें चकित केलें तर? तूंही जाऊन आतां एखाद्या बंडांत बहादुरी कर जा. बावळट कुठली? काय कसें बोलावें हें सुद्धां अजून कळत नाहीं, अन् लागली हातभर लाकडाच्या दहा दहा हात ढलप्या काढायला. तुम्हीच हिला शहाणी शहाणी म्हणून चढवून ठेवलीत, बरें कां ताई!

सगुणा—लीला आहेच शहाणी बरें कां! ज्याच्या पदरीं पडेल त्याचा पदर सोन्याचा करील.

उमा—हो, हिला मुलगा झाला म्हणजे मग त्या सोन्याला घेतांना हिच्या लुगडयांचा पदर होईल खरा. तुम्ही म्हणाल सोन्याचा लोक म्हणतील घाणीचा!

लीला—हेंग काय आई! कुणीकडलें बोलणें कुणीकडे तरी नेलेंस.

उमा—असेंच तुमचे हल्लींचे विचार भकत चालले आहेत, बरें कां लीला-ताई! खरें पहायला गेलें तर आपण बायकामाणसें, आपणाला करायच्या आहेत काय या देशी परदेशीच्या राजकारणांतल्या उठाठेवी! बायकांची अक्कल स्वयंपाकघराच्या बाहेर जाऊं नये. घरांतलें पुरुष आणून देतील तें येईल तसें गोडधड खायला करून घालावें. आपलें स्वस्थ असावें. तिकडे ते पुरुष आणि तो कारभारवाटेल तो गोंधळ चालेना तिकडे!

लीला—म्हणजे पुरुषांच्या गोंधळांत बायकांनीं मन घालूं नये, आलें माझ्या लक्षांत तूं असें कां म्हणतेस ती! स्वदेशीचा प्रश्न निघाला कीं तुझ्या हातांतल्या या परदेशी बांगडयावर संक्रांत येईल. आंगांतलें हें ऐटबाज विरवि-रीत पोलकेंही परदेशी म्हणून पर पुरुषासारखेंच टाकून द्यावें लागेल, आणि ओबड धोबड देशी जिनसाचा मारा सोसावा लागेल म्हणूनच आपली ही सारी धडपड; होयना आईसाहेब?

उमा—बरें बरें, तुला नाहीं सांगितली कुणी ही पंचाईत. माणसांनीं आपली पायरी ओळखून बोलत असावें. हें काय बोलणें तरी? ईश्य! जिभेला कांहीं हाड आहे कां नाहीं!

लीला—नाहीं, माझ्या जिभेला खास नाहीं. तुझ्या जिभेला आलें आहे कीं काय एखादें नवें उगवून?

सगुणा—उमाकाकू, त्या पोरीवर कां रागावतां! अहो पापाचरणाचा मार्ग सोडून पुण्याईचा पंथ धरण्याचा उपदेश करण्याचा जसा लहान मुलाला सुद्धां अधिकार असतो तसेंच हें देशी परदेशीचें. स्वदेशी जिन्नस दिसायला

भपकेदार नसले, नाजूक नसले, तरी ते आमचेच; त्यांनाच आम्हीं आंगाखांद्यावर वागविले पाहिजे. आम्हीच आपले जिन्नस दूर लोटले, आमची मुलें कुरूप म्हणून त्यांना विचारलें नाहीं, किंवा स्पष्टच बोलतें राग नको येऊं देऊं. आम्ही लग्नाच्या बायका आपल्या नटथापटयांत अशा तशाच म्हणून घरच्या पुरुषांनीं आणखी कांहीं तरी मनांत आणलें तर तें आपल्याला खपेल कां ?

लीला—बोल आई, खपेल कां ? बरे झालें सगुणा वहिनीच म्हणाली तें; मी म्हटलें असतें असें कांहीं तरी, तर आतां माझ्या गालाची नाडी चिमटींत धरून पहायला आईचे हात धावले असते.

वेणू—उमाकाकू, पुरुषांना आपला कारभार करूं द्या म्हणून इतके दिवस आह्मी झोंपा घेतल्या, पण आपणही आतां जागे होण्याचा काल आला नाहीं कां ! संसारांत स्त्री पुरुषांचा दर्जा सारखा असे निदान हल्लींचे शिकलें सवरलेले लोक तरी कबूल करतात ना! राष्ट्राची सर्वच घडी नवीन बसावयाची, अशा महत्वाच्या वेळेला अगदीं मागासलेलें महार, त्यांना सुद्धां महात्माजी पुढें खेंचीत आहेत आणि आम्ही पांढरपेशांच्या बायकांनीं यांतून चार अक्षरें येत असलेल्या पोलकेबाज बायकांनीं मात्र—आपल्याच नखऱ्यांत गर्क असायचें हें इष्ट तर नाहींच, पण शक्यही नाहीं. पुरुषांनीं आजपर्यंत धडपड केली, पुरुषांनीं राष्ट्रासाठीं कष्टही सोसलें, पण त्यांनीं आजवर आम्हांला हाक मारून विशेष त्रास दिला नाहीं. आतां मात्र त्यांनीं 'नको' म्हणत असतांसुद्धां आम्ही त्यांच्या बरोबर उभें राहून हा राष्ट्रकार्याचा बोजा उचलायला एक जिवानें हात भार लावला पाहिजे.

उमा—ताई, मी इतक्या खोल पाण्यांत आजवर कधीं शिरलें नाहीं, आणि असल्याप्रकारचे विचारही कधीं आपल्या मनांत आले नाहींत.

लीला—मग आतां चल पुढें खोल पाण्यांत कांहीं बुडायची नाहींस. करच एकदां मनाचा निश्चय, म्हणजे आमच्या काकांची खरी बायको शोभशील.

उमा—लीले, लीले ! काय तरी बोलणें हें तुझें ? म्हणजे का मी आतां खोटी बायको आहे वाटते इकडची !

वेणू—मग उमाकाकू, ठरवा एकदां मनाशीं विचार. तुमच्या सारख्या पुढारी मंडळींच्या बायकांनींच कामाला सुरुवात केली, म्हणजे बाकीचा स्त्रीसमाज सहज वळेल. काकू, मला तर वाटतें या कामाला सभा नकोत, अध्यक्ष नको.

ठरावाचे फार्स नकोत. कांहीं नको, प्रत्येकीनें आपापल्या घराच्या आसपास सहज दुपार तिपारच्या वेळांत जरी हा प्रयत्न केला तरी सुद्धां किती तरी काम होणार आहे.

लीला—मी आहे तयार! ताई तूं सांगशील तें करीन. आसपासच्या बायकांना रोजच्या वर्तमानपत्रांतले महत्वाचें लेख वाचून दाखवीत जाईन, त्यांना चरक्यावर सूत कसें काढायचें तें शिकवीन, स्वदेशीचें व्रत पाळण्यांत आपल्या देशाचे कसें कल्याण आहे हें त्यांना समजावून देईन—

उमा—झालां; आपण सरलादेवी चौधराणी किंवा सरोजिनी नायडू बनलां आतां काय तुम्हांला दोन बोटें स्वर्ग उरला—

लीला—नाहीं, इतक्यांतच स्वर्गाच्या इतके जवळ जाण्याची माझी तयारी झालेली नाहीं. मग आई, सांग आतां, यांतलें तूं कोणतें काम पत्करणार!

उमा—मी काम करतें तुझ्यावर देखरेख ठेवायचें; त्या कामाला सुद्धां मला एकटीला पुष्कळ कष्ट पडतील.

लीला—कबूल, पण आमच्यावर देखरेख करणारें माणूस आमच्यापेक्षांही जास्त स्वार्थत्यागी, जास्त माहीतगार असें असलें पाहिजे. पण तुला दुसरीच एक मोठी अडचण पडणार आई!

उमा—ती कोणती बाई!

लीला—ताई, या कामाकरितां बाहेर हिंडणाऱ्या बायकांनीं तरी खादीचा उपयोग आधी केला पाहिजे नाहीं कां?

वेणू—हो, स्वतःची करणी बोलण्याच्या विरुद्ध असली तर त्या बोलण्याचा काय उपयोग?

लीला—मग कसें काय, आईसाहेब? काळाकडे पाहून आपण आपल्या पोषाखांत फरक करणार, कीं हिंदुस्थानशीं कांहींच संबंध नसल्यासारख्या बाकीच्यांतून तुटून वागणार?

उमा—कांहीं झालें तरी काळाच्या वावटळीबरोबर गिरक्या खाणाऱ्या वाळल्या पाचोळ्याइतकी कांहीं मी परतंत्रपणांत वागणार नाहीं? तुमचें काम मला बरोबर वाटलें मी त्यांत कष्ट करीन, पण उगीच आपले अमके एक असें नाचतात तसें तुम्हीही नाचूं लागा म्हणाल, तर तें मात्र मी कबूल करायची नाहीं.

**वेणू**—उमाकाकू, बाहेर दाखविण्यासाठीं म्हणून ज्या गोष्टी करायच्या त्या लोकांसाठीं—त्यांच्यावर आपलें वजन पडून काम व्हावें, यासाठीं करायच्या असतात. अहो, तुम्ही खादीचा कपडा वापरूं लागलां, तुम्हीच साधेपणानें वागूं लागलां, म्हणजे लोकांना तुमच्या मागून जायला जास्त उत्साह येईल.

**लीला**—नाहींतर आताचें तुझें करणें म्हणजे परदेशी मालाच्या दुकानदारानें गांधी टोपी डोकीला घालून विक्रीस बसण्यासारखें आहे. तें कांहीं नाहीं, ताई, आई कांहीं इतक्यावर बधायची नाहीं. आपण दोघीजणीच कामाला सुरवात करूं. मी माझा चरका घेऊन पुराणाच्या वेळेलाच एखाद्या देवळांत जाते म्हणजे अनायासें वायकांत बोलासवरायला सांपडेल.

**उमा**—म्हटलें आपण जातांनां खादीच नेसून जाणार ना ?

**लीला**—आई, अजून तुला शंकाच आहे कीं काय ? शक्य तर इंग्रजांच्या हातून कां होईना पण हिंदुस्थानला स्वराज्य मिळेपर्यंत लक्ष्य आहेना आई ! हिंदुस्थानला स्वराज्य मिळेपर्यंत आई, तुझी लीला गोड जिन्नस खाणार नाहीं, पायांत जोडा वहाणा वगैरे घालणार नाहीं, खरोखर तुझेच पाय साक्ष ! तोंपर्यंत खादीच नेसत जाईल. [त्रिंबक. प्र. क.]

**त्रिंबक**—खादीच नेसत जाईल ! अरे, सुखासुखीं तुम्हांला हे आकाबाईचे दरिद्री डोहाळे कां आठवूं लागले ? परमेश्वराच्या कृपेनें चांगलीं कापडें ल्यायला मिळत असतांना म्हणे मी खादीच नेसत जाईन ! चांगले पक्वान्न पुढें ताटांत वाढून 'खां—खा' म्हणून आग्रह चालला असतां, तें ताट हट्टानें बाजूला ढकलून म्हणायचें कीं मी आपली शिळ्या भाकरीचेच तुकडे मोडीत बसेन! अरे पण कां असें ! देव देतो तें उपभोगायला दैवाला कां मध्यें आडवे टाकतां ? तुह्मी भिकाऱ्यासारखे वागलां म्हणून जगाला थोडीच लाज वाटावयाची आहे ? तुह्मी आग्रहानें आपल्या घरांत उपाशीं मरायला लागलां म्हणून जग थोडेंच तुमच्या उशाशीं धावत येऊन तुम्हांला खाऊं घालणार आहे ? तुह्मी उपाशी राहिलांत, आपलाच जीव गमावून घ्याल ! तुह्मी खादी नेसून दरिद्र्यासारखे भटकायला लागलां तर तुमची तुह्मांलाच लाज वाटली पाहिजे.

**लीला**—दादा, आतां खादीची लाज बाळगण्याचे दिवस नाहींत. आजकाल गांधी टोपी मोटारींतूनसुद्धां चमकताना दिसायला लागली आहे.

उमा—गप बैस! वडिलधारें ओळखायचें नाहीं, वाटेल त्यास वाटेल तसें बोलत सुटायाचें हें काय? चला वहिनी, आह्मांला कुंकू लावा. संध्याकाळ झाली जाऊं द्या बाई.

[ उमा. लीला. जातात.]

सगुणा—हें काय? असें उभे काय रहायचे तें! कपडे उत्तरायचे नाहींत कां? कसला विचार चालला आहे? आज ऑफिसांत कांहीं विशेष नाहीं ना झालें?

त्रिंबक—( कपडे काढूं लागतो ) ऑफिसांत विशेष तें आजच काय व्हायचें रोजच्याप्रमाणें चार घास पोटांत घालून ऑफिसची टाईम गांठण्यासाठीं म्हणून धावपळ करीत धापा टाकीत इथून गेलों. पाच दहा मिनीटांच्याही उशीराबद्दल सुपरिटेंडंटच्या दहावीस शिव्या खाल्ल्या, अकलेचा निदान पाच चार वेळां तरी त्या बेअकली माणसाकडून उद्धार करून घेतला-झाले हें रोजचेंच आहे! हें आत आमच्या अंगवळणींच पडलें.

वेणू—दादा, दिवसभर वेळीं अवेळीं अंग मोडून काम करणाऱ्याच्या त्य कामाकडे पाहून त्याला थोडा उशीरसुद्धां माफ होत नाहीं कां?

सगुणा—वन्सं हें असेंच आहे बरें! त्या पलीकडल्या रमाबाईचे यजमान- इकडच्याच आफीसांत बदलून आले आहेत ह्मणे. विचाऱ्याला ओ म्हणतां ठो सुद्धां हो येत नाहीं. परवां कचेरीतला हवालदार येऊन बसला होता, तो ह्मणत होता गृहस्थाला चार ओळी लिहायच्या झाल्या, तर तीन दिवस विचार, सत्तावीस ठिकाणीं खोडाखोड करावी लागते ह्मणे. पण त्याच्यावर साहेब अगदी खूष असतो; कां तर त्याला कधीं उशीर होत नाहीं एक मिनिटभर—

त्रिंबक—त्या रामभाऊबद्दल ह्मणतेस होय? त्याची तर स्पेशल ग्रेड संबंधीं शिफारस केली आहे साहेबांनीं! बिचारा ऑफिसांत जातो, तो रिकार्डांत जाऊन खुशाल लोळत पडलेला असतो! जाऊं द्या, कोणाचेंही बरें झालें तर आह्माला त्यांत आनंदच आहे.

वेणू—पण तुमचे साहेब मोठे शहाणे असतात ना? खरेंच दादा, कालच्या पाकीटांत साहेबानें काय लिहिलें होतें? तुह्मी वरवर शांतपणा दाखवितां पण तुमचें मन कांहीं स्वस्थ नाहीं!

**सगुणा**—इतकें त्रासण्यासारखें त्या पाकीटांत आहे तरी काय! वन्सं तुम्ही तरी वाचून पहा एकदां.

**त्रिंबक**—नको, ताई तूं त्या पाकीटाला हात सुद्धां लावूं नकोस. माझ्या सारखीच तूंही गोंधळून जाशील, तुलाही सुचेनासें होईल, तूं नकोच वाचूं तो लेख! जा ताई, कांहीं तरी घरकाम कर जा.

**सगुणा**—असं काय वरं करायचं तें! इकडे त्या पाकीटाचें नांव निघालें कीं, जीव असा घाबरून जातो. क्षणांत राग येतो, क्षणात डोळ्यांत पाणी उभें राहतें आहे. आम्हाला नाहीं कां सांगायचें त्यांतील काही।

**वेणू**—दादा, अशा स्थितींत आमचें तरी घरांत कामाकडे लक्ष्य लागेल कसे! दादा, मी वाचायला नको तर मला सांगून टाका ना!

**सगुणा**—ऑफिसांतल्या कांहीं कामांतल्या चुकीचा टपका—

**वेणू**—ही गोष्ट शक्यच नाहीं. आज दादासारखा कलमबहादुर सगळ्या खात्यांत कोणी नाहीं, असा तर दादाचा लौकिक गाजतो आहे.

**त्रिंबक**—पुढें ही कलमबहादुरी अशी माझ्या प्रपंचांत बिघाड आणणार हें आरंभींच कळलें असतें तर खुशाल एखादें दुकान घालून हिंग जिरे विकीत बसलों असतों. पण आजचा हा फास माझ्या गळ्याला—छे! माझ्या गळ्याचा फास सुद्धां मी आनंदानें सोसला असता, पण हा प्रसंग त्याहीपेक्षां भयंकर—फारच भयंकर!

**वेणू**—दादा, तुमच्या जीवाची अशी ओढाताण पाहून आमचा जीव उगीच घावरा व्हायला लागला आहे. त्यापेक्षां असें वीष तरी कसलें भरलें आहे, तें एकदां सांगून टाका, म्हणजे आम्हाला त्याचें स्वरूप तरी कळेल.

**त्रिंबक**—बाळे, ताई, काय सांगूं कसें सांगूं? माझीं पिलें मीं पंखाखालीं जतन करून वाढविलीं, तीं अशीं ऐन वेळेला त्यांचा घात करायलाच कां? ताई, तरी मी पहिल्यापासून म्हणत होतों, कीं, बाळानों नव्हे हें, आपल्याला जाचेल. तोच प्रसंग आज आला?

[ वसंत पाकीट घेऊन प्रवेश करतो. ]

**वसंत**—कसला प्रसंग आला? दादा, तुमच्या वरिष्ठांना तुमच्याकडून खुलासा पाहिजे एवढेंच ना! तुमचा भाऊ कॉलेज सोडून दारूच्या गुत्त्यावर पिकेटिंग करूं लागला, बहिण नॉनकोऑपरेटरच्या शाळेंत मास्तरणीचें

काम पत्करून चरक्यावर व्याख्यानें देऊं लागली, म्हणून तुमचे साहेब तुमच्यावर रागावले आहेत! आणि त्याबद्दल तुम्हाला धाक लावून आम्हांला वठवणीस आणूं पहाताहेत. खासा न्याय! शिष्यापराधे गुरोर्दंडः!

**त्रिंबक**—न्याय असो कीं अन्याय असो, आहे हे असें आहे. पण तूं कशाला वाचलेंस तें पत्र?

**वसंत**—त्यांत काय आहे! आमच्या कृत्याबद्दल आम्हीं जबाबदार आहों. आम्हीं आतां तुम्हांला मुलें असलों, तरीं जगाच्या दृष्टीनें वयांत आलों आहोंत, आमचें आम्ही स्वतंत्र आहों आमचे करणें कायद्याच्या बंधनांत येत असलें, तर त्याबद्दल शिक्षा द्यायला सत्ताधीश सरकार समर्थ आहे. फार झालें तर आमच्यावरच्या खटल्यांत तुमची भीड तुमच्या साहेबानें ऐकूं नये! पण अशा आडून गोळ्या काय म्हणून!

**सगुणा**—पण भाऊजी, आज नोकरी साहेबांच्या हातांत आहे ना? त्याला असें बेपर्वाईचें उत्तर देऊन कसें चालेल?

**वसंत**—पण यांत दादाची बेपर्वाई कशी काय दिसणार हेंच मला समजत नाहीं. नोकरी दादा करताहेत! दादांचा पिकेटर भाऊही नोकर नाहीं; किंवा त्यांची मास्तरीण बहीणही कुणाची ताबेदार नाहीं! दादापुरतें त्यांनीं विचारावें हवें तर.

**वेणू**—नोकर दादांची आम्ही भावंडें अशीं वागतों म्हणून जर वडयाचें तेल वांग्यावर निघून दादांना छळायचा हा डाव असेल तर मात्र गोष्ट जरा निराळी.

**वसंत**—निराळी कसली! एकच गोष्ट! पण त्याची दादांनीं कशाला भीति बाळगावी इतकी! दादांचा हा एक साहेब म्हणजे कांहीं भारतसम्राट नव्हे. त्याच्या डोक्यावर एकांपेक्षां एक छपन्न अधिकारी आहेत. थेट व्हाईसरायापर्यंत ओरड करून दाद लावून घ्यावी एकानें माणुसकी सोडली म्हणजे कांहीं कांहीं सगळेच साहेब पशू बनत नाहींत. दादा, तुम्ही अगदीं भिऊं नका, द्या उत्तर ठोकून! हा साहेब काय करतो तें तरी पहूं. माहात्मा गांधींना खुद्द येशूच्या तोडीला बसविणारे साहेब जर या जगांत आहेत, तर या यःकश्चित बाबीपुरता न्याय देणारा इथें कोणीच वरिष्ठ अधिकारी मिळणार नाहीं कां?

**सगुणा**—पण भाऊजी, ही विषाची परीक्षा होणार. एखादे वेळ तें विषच झाल्यानें प्राण गेल्यावर मग अकलेचा उपयोग आहे का कांहीं!

**त्रिंबक**—वसंत, तुह्मासरख्या तडफेच्या तरुणाच्या तोंडीं तसलेच विचार दिसायाचे. मागल्या पिढींतल्या कर्तबगार मंडळींनांही मागें टाकणारी अशी पुढली पिढी असायाला पाहिजे खरी, पण तुम्ही अजून खरोखरच मुलें आहां. राजकारणाच्या किंवा जगाच्या कोणत्याही व्यवहारांतली तुमची दृष्टि अजून केवळ आशेची, सुखाची आहे. त्यामुळें कोणतीही नवी हुल्लड उठली कीं तुम्ही ही विकारवश वृत्तीनें धांवू लागतां आणि तुमच्याबरोबर आम्हांला धावता येत नाहीं, पुढलें खाच खळगे आम्हांला दिसल्यामुळें आमचे पाउल जरा जपून पडतें, तेंही तुम्हाला असह्य होतें. पण बाळांनों, अनुभवाच्या खडकावर आपटून आपटून हुळहुळीं झालेलीं आमचीं डोकीं असल्या विकारांत तुमच्यासारखी धडक मारीत नाहींत त्याला काय करावें ?

**वसंत**—पण तुम्ही स्वस्थ कां बसत नाहीं ? पुढें पुढें होऊन अमुक करा, तमुक करूं नका असा उपदेश करायला तरी तुह्मांला कधीं कोणीं पाचारण केलें होतें ? दादासाहेब, आपण वृद्ध अनुभवी आहांत, तरी तुमचे विचार आह्माला पटत नाहींत.

**त्रिंबक**—महाराष्ट्रांतल्या कर्त्या पुढाऱ्यांवरसुद्धां ही चळवळ मागें टाकल्याचा जर तुम्ही आरोप करतां, राष्ट्राचा धन्यवाद मिळवलेल्या माणसाबद्दल सुद्धां जर तुम्ही आतां उघड तिरस्कार दाखवितां, तर तिथें आमच्यासारख्याला विचार-तो कोण ?

**वेणू**—पण दादा, तिकडे बंगाला दासांनीं हलविला, पंजाबचा लाल खारखा चमकून राहिला आहे. मग बाळांच्या मागें महाराष्ट्रच कांहो जागेपणा दाखवीत नाहीं ?

**वसंत**—महाराष्ट्रातल्या पुढाऱ्यांचे प्रतिनिधी, याचें उत्तर द्या. दादा, आमच्या पुढाऱ्यापाशीं स्वार्थत्याग नाहीं—

**त्रिंबक**—स्वार्थत्यागांत महाराष्ट्र कोणालाही हार जाणार नाहीं. महाराष्ट्र दरिद्री आहे, जन्मतःच भिकारी आहे—, बंगालच्या दासांची प्रत्यक्ष लक्ष्मी दास होऊन राहिली आहे, महाराष्ट्रांत कोणी बायकांचें नांव लक्ष्मी ठेवलें तरी तिच्याशीं त्या बिचाऱ्याचा सुरळीत संसार चालत नाहीं. पंजाबचे लाल स्वतःच्या खर्चानें अमेरिकेंत पांच वर्षे राहूं शकले, आमच्या गरीब महाराष्ट्राच्या पुढाऱ्याजवळ स्वतःचें अवेळीं धडसें धोतरही नसतें ! त्यांना चार दिवस बिलायतेला

**बाळकोबा**—[आडून पाहून ] हें पाकीट कसलें! मापू काहीं इथें दिसत नाहींत ! काय आहे भानगड ही ( जातो ) [ दुसरें पाकीट येतें तें पाहून ]

**त्रिंबक**—हा घ्या माझ्या म्हणण्याचा प्रत्यक्ष अनुभव ! आतां कसें काय करायचें बोला [ वसंत, वेणू वाचतात ]

**वेणू**—सस्पेंड केलं ! इतक्या झपाटायनें अशा थरावर गोष्टी आणण्यांत कुणाची तरी जोराची खटपट असली पाहिजे, दादा.

**सगुणा**—खटपटीचें पुण्य कोणाच्याही पदरीं असलें तरी त्या विचारानें हें संकट दूर होत नाहीं ! काय चमत्कार तरी ! ध्यानीं मनीं नाहीं, आपलें घटकेच्याआंत इथपर्यंत आलें !

**वसंत**—माझ्या म्हणण्याप्रमाणें जोर धरून भांडायला दादा, तुमचें धारिष्ट होत नाहीं, आणि ही नोकरी अशी लाथेनें झुगारून देण्याला पोट पुढें येतें. तेव्हां आतां मला एकच उपाय—

**वेणू**—तुमच्या त्रासाला कारण झालेलीं आम्ही दोघें भावंडेंच या घरांतून बाहेर पडतों—

**वसंत**—म्हणजे मग तर तुमच्या साहेबांचा सबेमिरा सरळ सुटेल ना ! साहेबांच्या इच्छेविरुद्ध वागणाऱ्या सख्या भावंडांना दूर लोटल्यावर-आम्हांलाच बाहेर हाकून लावल्यावर-मग तर साहेबांची मर्जी जाण्याचें कारण नाहीं ना ?

**त्रिंबक**—शेवटीं याला हाच कां उपाय निघाला ! वसंता, आम्हांला सोडून तुम्ही जाणार कुठें ! तूं अजून अल्लड, ताई ही अशी तुमचें होणार कसें ? ताई, ज्या प्रसंगाला मी आरंभापासून भीत होतों तो आज हा असा अचानक अंगावर आला ! वसंत, तूं मला सोडायला तयार झालास ! ताई तुलाही माझ्याबद्दल कठोर मन करवलं ना ?

**वेणू**—नका, दादा, असें काकुळती येऊन बोलूं नका ! दादा, माझ्या मनांत तुमच्याबद्दल कठोर कल्पना येईल तरी कशी ? दादा, आज जगांत मला तुमच्या शिवाय कुणी आहे कां ? आईबाप, संसार, सौभाग्य—

**त्रिंबक**—बाळे, हुंदका आवर ! माझं काळीज कळवळतं, माझाही गळा दाटून येतो, शब्द उमटत नाहीं—

**वसंत**—दादा, काय हें ? मनाला जरा आवरून धरा. मोठ्या धडामो-डींचा काळ आहे हा ! या वेळेला अशा प्रसंगाला मन तयार केलंच पाहिजे.

पूर्वी छत्रपतींनीं स्वराज्याचें शिंग फुंकून लढाईला कंबर कसली, त्या झटपटींत हजारों तरुण आपल्या सुखाच्या संसाराला कायमचे मुकले, पण त्यावेळेला त्यांच्या आप्तेष्टांनीं धैर्य सोडलें नाहीं, त्यांनीं पुन्हां पुढें होऊन महाराजांना पाठिंबा दिला, तेव्हां तें कार्य झालें. आम्हीं नुसतें घरांतून बाहेर जाणार एवढया कल्पनेनंच तुम्हाला घाबरवून सोडलं !

त्रिंबक—वसंता, तसले प्रसंग निधडया छातीनें सोसण्याची आमच्या अंगांत आतां ताकद राहिली नाहीं रे ! विरोधी परिस्थितीचे तडाखे सारखे सोसतां सोसतां आतां राष्ट्र दुबळें झालें ! सगळ्या हिंदुस्थानांत परकी सत्तेचें जूं न घेण्यासाठीं अव्याहत धडपड करणारा एक महाराष्ट्र, झगडतां झगडतां, पिढयानूपिढया हे जिव्हाळ्याचे तरुण तोंडीं देण्याचें प्रसंग सोसतां सोसतां, आमचा महाराष्ट्र थकून गेला ! वसंता, आतां प्रेमाची माणसें घटकाभर संकटांत पडलीं तरी सुद्धां जीव घाबरतो, धीर निघत नाहीं.

सगुणा—भाउजी, इकडे उतार वयांत आतां तुम्ही घराबाहेर पडून दुःख देण्याचें पाप पदरीं घेऊं नका ! वन्सं, हें कोवळें अंतःकरण तुमच्या या करण्यानें भाजून निघेल. असा अविचार करूं नका.

वेणू—दादा, शांत व्हा ! आजच्या परिस्थितींत आम्ही तुमच्या जवळ नसणेंच जास्त श्रेयस्कर आहे. नोकरीला पारखे होऊन सगळ्यांनींच बेकार स्थितींत राहाण्यापेक्षां तुमचा योगक्षेम तरी चालला आहे, त्यांत बिघाड यायला नको. आम्ही बाहेर गेलों तरी तुमच्या नजरेखालींच राहूं. तुमचा आशीर्वाद तुमच्या कृपेचें छत्र आम्हांवर असल्यावर कसल्याही कठीण स्थितींत आम्ही समाधान मानूं बरें आहे. वहिनीं, दे मला निरोप; चल रात्र होत चालली.

त्रिंबक—म्हणजे तुम्हीं आतां जाणार ? अन् जाणार कुठें ? कशाची कांहीं व्यवस्था नाहीं, तजवीज नाहीं. रात्रींच्या वेळेला अवचित घरांतून बाहेर पडणार ! ताई, जरा थांब, आपण पुन्हां एकदां रात्रभर बसून याचा पुरा विचार करूं—

वसंत—तें कांहीं जुळायचें नाहीं. कितीही विचार केला तरी त्याला दुसरी तोड निघणें शक्य नाहीं. आजचें रात्रीपुरती ताई शाळेंतच निजेल, बोर्डिंगातल्या मुली आहेतच सोबतीला, मीही जाईन कुणातरी सोबत्याच्या घरीं— किंवा तसें तरी कशाला ? त्या स्नेहाचा कोणी तरी बापभाऊ नोकर असला तर त्याचाही साहेब त्याच्यावर गरम व्हायचा. पिकेटरला रात्रीपुरता तरी

होऊं दे." या संसाराच्या चतुःसूत्रीचा आपण मला आशिर्वाद द्या. त्यांतला पहिला निम्मा भाग माझ्या हातीं आला आहे. निम्में स्वराज्य मी हल्लीं उपभोगतोंच आहे, पुढलें निम्में स्वराज्य मिळण्यासाठीं हा प्रयत्न आहे. मी औक्षवंता आहे, कारण आयुष्याशिवाय प्राणी जगणें शक्य नाहीं, आणि मी अजून जिवंत असून मेलों नाहीं, तेव्हां मला आयुष्य आहे. भाग्याचाही माझ्या जवळ प्रश्न नाहीं, रयत लोकांत, जगांत चहूंकडे भाग पाडण्याचाच माझा उद्योग असतो; तेव्हां उरलेलीं दोन सूत्रें माझ्या पदरीं टाका, म्हणजे हा चतुः सूत्रधार या जगाच्या रंगभूमीवर आपल्या संसार नाटकाची नांदी विजयानें म्हणूं लागेल.

**उमा०**–( स्वगत ) दिसतोय अर्धवटापैकीं, आपला साधा भोळा आहे झालें. ( उघड ) बरें आहे, माझा तुम्हांला आशीर्वाद आहे, झालें ना? लग्न होऊन लवकर मुलगा होऊं दे, असें मी म्हणून तुमचें समाधान होतें, त्यांत माझें काय हो बिघडलें?

**बाळ०**--तसा मी तुम्हांला दूरचा नाहीं. जवळच त्रिंबकरावांच्या बिऱ्हाडीं सावळारामाकडे माझें नेहमीं जाणें येणें आहे. परवांच्या व्याख्यानाचें वेळीं काकांच्या अभिनंदनपर ठरावावर मी भाषण केलें–

**उमा०**--हो कां? तेंच कां तुम्ही! मग बरें झालें बाई तुम्हीं मुद्दाम घरीं आलां तें.

**बाळ०**--बापू म्हणत होते, कीं माझें भाषण चांगलें झालें म्हणून. खुद्द काकांनीं माझें भाषण चाललें असतांनाच 'भले बहाद्दर' म्हणून माझ्या पाठीवर शाबासकी दिली. शेवटीं लोकच 'पुरे! बस आतां' म्हणूं लागले तेव्हां बसलों झालें पण माझ्या प्रत्येक शब्दाला टाळ्यांचा नुसता कडकडाट उडत होता.

**उमा०**—तें सारें मी इथें आल्यावर ऐकलें होतें.

**बाळ०**--त्यांतला एकजण विचारूं लागला 'ही विचित्र व्यक्ति कोण?' मी मनांत म्हटलें विचित्र हा असातसा किरकोळ माणूस नसून एका नाटकांतला नायक आहे आतां तें नाटक संगीत नसल्यामुळें माझा थोडा विरस झाला, पण म्हटलें त्यांत काय आहे? आधीं प्रोज अन् मग संगीत!

**उमा०**--(स्वगत ) हा इथें आला आहे तरी कशाला? आधीं नमस्कार, त्यावर व्याख्यान, व्याख्यानांतून नाटक, एकांतून एक सारखा सपाटा चालला आहे अजून याचा उलगडा नाहीं होत नीटसा.

तशींच स्वतंत्र राहूं. काय व्हायचें असेल तें आमचेंच होऊं द्या. वसंतानें सुद्धां यांत पडायला नको होतें, पण आतां काय त्याचें?

लीला०—हें ग काय ताई? दादा एक सरकारी नोकर, त्यांना भीति असेल, पण आमच्या इथें कसली अडचण आहे? काकांनीं तर वकीलीसुद्धां सोडली; आतां त्यानां सरकारची कसली भीति?

वेणू०—सरकारची भीति प्रजाजनांपैकीं प्रत्येकाला आहे। तशीच सरकारची भीति त्यांच्या अगदीं तावेदार अशा गुलामालासुद्धां वाळगण्याचें कारण नाहीं. सरकार ही एक यांत्रिक शक्ति आहे, जोंपर्यंत यंत्रांची हालचाल बरोबर रीतीनें चाललेली असते तोंपर्यंत त्या यंत्राजवळ राहणारा मनुष्यसुद्धां निर्भयपणानें काम करून घेऊं शकतो. पण तेंच यंत्र बिघडून त्याचा स्फोट होऊं लागला तर दूरच्या माणसाला सुद्धां आपल्या जीवाची जोखीम वाटूं लागते.

बाळ--( स्वगत ) या यंत्रांत बिचारा बाळकोबा सांपडून त्याचा मात्र चुराडा व्हायची पाळी आली आहे! बाळकोबाकडे कोणाचें लक्षही नाहीं. काय करावें? तोंड घालून एखाद वेळ तोंडांत थप्पड बसली तर फुकट फजिती व्हायची.

काका--काय काय होतें आहे तें आमचें आम्हीं पाहून घेऊं. पण तुम्हांला अशीं जगांत निराधार सोडायला मी तयार नाहीं. ताई, तूं बायकोमाणूस, त्यांतून तरुण-- ही अशी! वसंत तर काय पोरसवदा जिन्नस, तुम्ही दोघे करणार काय?

उमा-काय करायचें तेंही यांनीं ठरविलें आहे म्हणे. चरक्यावर सूत काढून मागावर धोटे मारणार!

वेणू--विणकर लोकांची म्हणच आहे. 'सरळ पाहून मारावे धोटे, जाऊं नये कुणाच्या वाटे?'

काका-वसंत, वसंत! काय पोराची स्थिति झाली ही! आरंभापासून फर्स्ट क्लास करीअरचा बुद्धिमान बाणेदार तरुण, यंदा महिना पंधरा दिवसांत शेवटली एम्. बी, बी. एस् होणार, डॉक्टर म्हणून लौकिक मिळविणार, इतक्यांत ही गांधी टोपी त्याच्या डोक्यावर बसली! पहिल्या भरांत कॉलेज सोडलें, तो आज निर्वाहाकरितां धोटे मारीत बसणार! ताई, याला कांहीं लोक सावेपणा म्हणतील ते म्हणोत, पण मला तरी हें जरा कसेंसेंच वाटतें?

लीला-यांत काय आहे काका! एखाद वेळेला परटाकडे सगळेच कपडे धुवायला गेले म्हणजे आपण नाहीं कां कांहीं वेळ तसेच उघड्या आंगानें हिंडत? उद्यां स्वराज्य मिळाल्यावर आमच्या नव्या राष्ट्रीय कॉलेजांतून नव्या डिगऱ्या निघतील, तेव्हां पुन्हां होईल कोर्स पुरा. तोंपर्यंत चार दिवस प्लेगमुळें कॉलेज बंद आहे, असें समजलें म्हणजे झालें.

बाळ--( स्वगत ) वसंताचा विषय निघाला आहे. देऊं कां टाकून चार शब्द मधेंच? करूं कां एक बॉंबचा स्फोट? काय करावें? आमचे गुरुजी कुठें गेले या वेळीं? संधि कशी नामी चालली आहे, बघूं याचं एकदां प्रयत्न करून. ( उघड ) काका, वसंत खादी वापरतो, आणि माझाही ड्रेस खादीचाच आहे!

लीला--पण तुम्ही कॉलेज कुठें सोडलें आहे!

बाळ--कॉलेज सोडायला तें आधीं धरलें असेल तेव्हां ना? मी तर कॉलेजच्या मूळ पायांत-अगदी शाळेपासूनच एकेक शिक्षणाची बाब सोडायला सुरुवात केली! शाळा सोडण्याच्या बाबतींत खरा नानकोऑपरेटरवाल मी आहे!

उमा--मग तुम्हीं तुमचें पुढलें शिक्षण घरीं केलेंत वाटतें?

लीला--घरीं, दारीं, बाजारीं सारखा शिक्षणावर मारा करून तें अगदीं नामशेष केलें.

बाळ-- हो! तें मात्र अक्षरशः खरें आहे. शिक्षणाविरुद्ध इतका ओरडा चालला आहे तरी तें अजून आहे तसेंच कायम! त्याचें नाम शेषासारखें फणी काढून आपलें फूत्कार सोडतेंच आहे. ( स्वगत ) अरे पण! हें कुठेंतरी चाललें मुद्यावर कसें यायचें!

काका--ताई, कॉलेजांतले एकूण एक विद्यार्थी वसंत असते, किंवा, असहकारितेची बाब सगळ्यांनीच सारख्या जोरानें उचलून धरली असती, तर सरकारनींही आमची एकी जाणून लायकी ठरवून आम्हांला तेव्हांच पूर्ण स्वराज्य दिलें असतें. पण तेहेतीस कोटि लोकांचा एक जीव करणारी जाज्वल्य जादू अजून जराशी सुद्धां दिसत नाहीं, त्यामुळें स्वराज्य तर नाहींच, पण त्या नादांत वसंतासारखे तरुण मात्र आपल्या आयुष्यांतलें सुख सर्वस्वी घालवून बसले.

बेणू--काका, इतकें निराश होण्याचें कारण नाहीं. स्वराज्य हा स्वर्ग आहे!

बस्स! मीं धंदा आहे. ' लीले मी ही तुझा बंदा । आपुला लग्नासाठीं धंदा' आधीं लग्न, मग जन्म, अन् पुढें मरण! नाहीं, याच्या उलट मरण, जन्म अन् नंतर लग्न. माझा जन्म झाला. आतां माझा हा लग्नाचाच काळ आला आहे. काय करावें? मघाशींच मंडळीं असतांना ही लग्नाची गोष्ट काढली असती तर? लगेच पहातां पहातां लीलेचा हात अस्सा धरून चालूं लागलों असतों. [ चालूं लागतो, तों त्याच्या हातांत सावळारामाचा हात येतो. ]

बाळ०– वा! वा! वा! राजे!

सावळा०--वा, वा, वा। प्रधान! अहो गृहस्थ, तुम्ही आपले बेलाशक माझा हात धरून मला ओढायाला लागलां कीं! हीच माझ्या जागीं एखादी स्त्री असती तर?

बाळ०--तर काय! तीच असायला पाहिजे होती. मी मनानें उत्पन्न केली होती सुद्धां, पण मला वाटतें माझ्या मानसिक तपश्चर्येनें उलटी सृष्टि निर्माण झाली; ब्रह्मदेवानें म्हणे मानसिक सृष्टींत स्त्रीचा संकल्प केल्याबरोबर तेथें स्त्रीच उत्पन्न झाली मी स्त्रीचा संकल्प केला तों त्या स्त्रीच्या जागीं तुम्ही पुरुष उत्पन्न होऊन तुमचा हात माझ्या हातीं लागला! म्हणून म्हणतों माझें पुरुषाशींच लग्न होणार कीं काय? बाकी, कांहीं बापू! पुरुषाशीं लग्न झालें तर संसार कसा व्हायचा? कां त्यालाच स्त्री समजून लुगडें नेसायला द्यायचें?

सावळा०--तसा प्रसंग आला तर पहायला येईल. पण तुम्ही इथें आला होतां कशाला? मी तुम्हांला केव्हांचा हुडकतों आहे.

बाळ--वरं ओढलत मला. नाहीं तर मी माझ्या उलटया लग्नांतच बुडत होतों. काय राजे, तुम्ही आजची संधि घालविलीत! तुम्ही असतां मघाशीं तर एव्हांना आमचें ' शुभ मंगल ' उरकूनही गेलें असतें. तुम्ही गेलां होतां तरी कुठें?

सावळा०--मी गेलों होतो गांधी टिळकांच्या किंवा लोकमान्य महात्म्यांच्या व्याख्यानाला.

बाळ०–दोघांचें एकदम व्याख्यान कसें झालें बुवा! बाकी तशी एक सोय होईल म्हणा.-स्वर्गांतून टिळक, मृत्यु लोकांतून गांधी आणि पाताळांतून गोखले, असा हा तीनधारी व्याख्यायांचा मारा होईल तर किंवा गोखल्यांना करा डॉक्टर, त्यांच्या हातांत या गांधी टिळकांच्या दोन बाटल्या आणि म्हणावें दोन्हींचें मिक्श्चर करून त्यांत तुमचेंही औषध ओता थोडेसें ] अन् तें या एक

डोसभर सरकारला अन् डोसभर लोकांना ! आहे कीं नाहीं कल्पना ! बरें ! या औषधाचें नांव काय ठेवावें !

सावळा--लोक तुला मात्र खूप नांवें ठेवतील ! त्यांत काय अर्थ आहे ?

बाळ०--अर्थ नसला तरी चालेल त्यांत. 'लुलू' सपट, अशीं नांवें आहेतच कीं नाहींत ! तिघांच्या नांवाचें प्रत्येकीं एक अक्षर घेऊन जुळविलें तर ? 'गोगांटि' एका टोकाला गोखले, एका टोकाला टिळक अन् मधें गांधी, म्हणजे भांडणांची भीति नाहीं.' शेवटलीं अक्षरें घेतलीं तर, 'ले धीक, कुणीकडून तरी दोन दहा-न्मधें सहाचा डाव साधायाचा ! उरलेलीं अक्षरें मिळविलीं तर बनली 'खळ' ! बोला, बापू यांतलें तुम्हांला कोणतें पसंत आहे ? जुळवाजुळवीचें काम--हें इतकें अवघड--

सावळा०--तें छापखान्यांत जाऊन करूं, आणि मग त्याच्या जाहिराती काढून त्याला तुमची ही खळ लाऊं म्हणजे जुळेल.

बाळ--थांबा, जुळायला कंपाझिटर पाहिजे. मिक्श्चरचा डोस घोळायला कंपांउडर पाहिजे-- मग? नाहीं तर माझी खळीचीच कल्पना तुम्हांला पसंत असेल, तर ही खळ जहालांच्या अंगाला थोडीशी फासावी. मवाळांनाही तिच्यांत बुडवून काढावें, आणि हे दोन्ही पक्ष दोन बाजूंनीं द्यावेत गांधी-पक्षाला चिकटवून. म्हणजे हा त्रिमूर्तीचा अवतार बनेल कीं नाहीं ?

सावळा०--बाबा. हा त्रिमूर्तीचा अवतार व्हायला आधीं कुठल्या तरी आश्रमांत अनसूया जन्माला आली पाहिजे. तूर्त अन्नासाठीं जिकडे तिकडे असूयाच माजली आहे. यावेळीं तुझ्या त्रिमूर्तीची त्रिस्थळीं यात्रा झाली तर त्यांत नवल नाहीं.

बाळ०--पण तिघांनाहीं चिकटवण्याची माझी कल्पना--

सावळा०--आधीं आपण कुठें तरी चिकटूं अन् मग दुसऱ्याचा विचार करूं सावकाश.

बाळ०--मग काय ? काढतां माझ्या लग्नाचें बोलणें ? होऊन जाऊं द्या. आतांच्या आतां ! अनायासें वसंताची हाकालपट्टी झालेली आहेच. आतां काका परत आले कीं करा सुरवात.

होती, तर त्या विचाऱ्याला तळमळत घरीं टाकून बाहेर जाण्यांत यानें काय मिळविलें ? त्यापेक्षा राहीना होती ती त्या बाजारची उठाठेव !

लीला--आईसाहेब, हा ज्याच्या त्याच्या मनाचा धर्म आहे. स्वतःला पटणाऱ्या विचारांचा प्रश्न आहे. जी गोष्ट आपणाला महत्पाप वाटून आपण तिच्यापासून दूर राहण्याचा यत्न करीत असतों त्याच गोष्टीमागें पुण्यसर्वस्व म्हणून मोठ्या आस्थेनें धावत जाणारे लोक आपल्याला किती तरी दिसतात. त्याचें पळणें चुकीचें कीं आपलें दूर रहाणें मूर्खपणाचें हें काळानेंच ठरणार आहे. त्याच्या आधींच एखाद्याला वाईट म्हणून शेरा मारणें जरा उतावीळपणाचें होणार आहे.

उमा०--कळलें, माझ्या सारें ध्यानांत आलें। तूं कोणत्या जोरांत इतकी बोलत आहेस तीं. पण लीला ताई, आपण माझ्या पोटांत वाढलेल्या आहां आपल्यापेक्षां वऱ्याच गोष्टी मला जास्त समजतात बरें कां! वसंताशीं तुझें लग्न होणार या भ्रमांत आपले हें गुरकावणें चाललें आहे. पण ध्यानांत ठेव तुझ्या बऱ्याची काळजी तुझ्यापेक्षां मलाच अधिक आहे. तूं म्हणत असशील—

लीला०-- मी आतां कांहीं म्हणत नाहीं. आणि तूं बोलत माझ्यापुढें आहेस तोंपर्यंत बोलणारही नाहीं. तुला जें जें कांहीं कोणासंबंधी बोलायचें असेल. तें मनमुराद बोलून घे. बोलणें संपलें म्हणजे तुझी इच्छा असली तर तूं इथून आपल्या कामाला जा. नाहींतर मी तरी मग माझ्या उद्योगाला लागेन.

उमा०--मोठी उद्योगाची पडलीस कीं नाहीं? आजपर्यंत काय उद्योगाचे दिवे थोडे लावले आहेत, ते आतां त्याच्या मशाली करणार आपण? तुझ्या जवळ बोलत बसायला मी कांहीं आजच संसारावर तुळशीपत्र ठेवलं नाहीं त्या वेणू सारखं.—

लीला०--वासुदेव ? रामकृष्ण वासुदेव !

उमा०--मोठी संतीण बनून राहिली! काय एकेक सोंग चांगलें आहे पण? शांतीचा तुसता समुद्र, पण तो अगस्तीनें कोरडा केला. तेव्हां आतां—काय थोड पोरटी आहे हो! इतकें बोललें तर एक शब्द तरी आहे कां तोंडांतून ? ऐकायला येतयू कां म्हटलें? बस तशीच भोपळ्या सारखी फुगून. मला कुठें वेळ आहे तुझ्याशीं खेळत बसायला?[ जाते. ]

लीला०--परांत आतां कुणीसुद्धा नाहीं? मी एकदां मन मोकळेपणानें रडे

कां? पुष्कळ रडलें म्हणजे जीव हलका होतो म्हणतात. माझा जीव मघांपासून गुदमरल्या सारखा झाला आहे. आंतून सारखें हुंदके येऊन गळा दाटला आहे. तो रडण्यानें मोकळा होईल? पण मी रडूं तरी कुणाजवळ? माझें मन भाराखाली दडपल्यासारखें झालें, तें हलकें कोण करील? लीला आज रडवी झाली! जन्मभर हसत खेळत रहाणाऱ्या लीलेला आज रडावेसें वाटयला लागलें? लीला आतां लहान नाहीं. खरेंच लहान नाहीं. लीलेला सारें समजतें. डोळ्याला न दिसणाऱ्या अनिष्ट गोष्टी मनाला उमजतात. आणि मग जीव उदासवाणी होऊन कोमेजून जातो? लीला बाळपणीं रडत होती. पण तें तिचें रडणें तिलाच कळत नव्हतें. पण आतां सारें कळतें. लीला आतां लहान नाहीं. म्हणून ती मनानें समजून रडायला तयार झाली? लीला रडूं लागली. पण तिची समजूत कोण करणार? कोण म्हणजे--दुसरें कुणाचें अडलें आहे समजूत करायला! पण समजूत करणारीं माणसें अशीं हाकेला उभीं असल्यावर मग असें रडायचें तरी काय म्हणून? पण इथें कोण आहे? लीलेच्या रडव्या चेहऱ्याकडे पाहून इथें तिची समजूत घालायला कुणी--कुणीसुद्धां नाहीं. काका आहेत. पण आतां काकांच्या वरली सर्वस्वाची दृष्टि बदलली. आणि दृष्टि बदलल्या बरोबर सृष्टिहि एकदम निराळी झाली? आतां सदा सर्वदा—विचार-विचार—लीलेला मनांतल्या मनांतच कुढत राहिलें पाहिजे. [ सचिंत बसते--पडदा. ]

---

## अंक दुसरा—प्रवेश. ३ रा.

[ स्थळ–शहरांतील एका प्रमुख चौकांत वसंत सचिंत बसलेला प्रवेश करितो.]

**वसंत**–हा या शहरांतला मुख्य चव्हाटा. संध्याकाळच्या वेळीं कांहींना कांहीं तरी निमित्तानें या शहरच्या प्रत्येक कोपऱ्यांतले सुद्धां लोक एक तरी फेरी घालून जातातच. इतके लोक या ठिकाणीं गोळा होतात, आपलें काम करीपर्यंत इकडे तिकडे हिंडतात, गप्पासप्पा मारतात, आपल्या घराकडे चालूं लागतात. नुसत्या टिवल्या बावल्या करीत फिरणाऱ्या भटकेलांना तर या ठिकाणीं पुष्कळच वेळ

काढतां येतो- उगीच एखाद्या दुकानांत बैठक ठोकून रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीकडे बारकाईनें पाहण्यांत किंवा शेजारच्या आपल्या दोस्ताशीं त्याबद्दल चर्चा करण्यांतच आयुष्याचा वेळ घालविणारे हे रंगेल रंगराव-- लोकांच्या सोयीसाठीं म्हणून या ठिकाणीं इतर निरनिराळ्या मिश्रसाची दुकानें आहेत. तसाच हा इथें-किंचित् कोपऱ्यांत एक दारूचा गुत्ताही ठेवण्यांत आला आहे. दारू पिण्यांत लोकांची सोय होते--हो होतें खरी ! दारूंत बेहोष होऊन मनुष्य या जगाला विसरून जातो-- मनुष्य पशू बनतो--त्याला विचार रहात नाहीं-शक्ति रहात नाहीं-गरीब मनुष्यप्राण्या, दारूचे भयंकर परिणाम दिसत असून सुद्धां तुला दारूची भीति वाटत नाहीं, दारूचा तिटकारा येत नाहीं ! पण या विचित्र जगांत मनुष्याला बेभान करून जिवाची होळी करणारी काय एक दारूच आहे ! मदिरेपेक्षां मदिराक्षीनें उडविलेले अनर्थ काय कमी आहेत ? पण मदिराक्षीला कह्यांत आणून संसाराला जुंपतां येतें, मदिराक्षी ललना हीच संसाराचें ललाम आहे, तिचाच संसार-तिचाच हा सगळा सगळा पसारा—स्त्रीशिवाय जगाचा तरणोपाय नाहीं. नारीच्या कृपेनेंच नराचा उद्धार होऊन स्वानंदनारायणाची प्राप्ति व्हायची—

"नारीको निंदो नही नारी गुनकी खान ।
जिसमिसे पैदा हुवे ध्रुव प्रल्हाद समान ।"

काय, स्त्रीदेवते कुठें गेली ती पूर्वीची सात्विक शक्ति ! मातुश्री, आज राम जन्माला कां येत नाहींत ! हनुमानासारखा सूर्यमंडळाला भेदून जाण्याचा पराक्रम दाखविणारा सुपुत्र, बाई जननी, आज कोठें आहे ? ध्रुव प्रल्हादाचा निश्चय कुठें गेला ! निश्चयी पराक्रमी पुत्रांची वाण, माते, आज कां वाटूं लागली ? गेलीस—परिस्थितीखालीं तूंही चिरडलीस. जन्मभूमीबरोबरच जननीही दुबळी झाली ! आतां या अवनतींतून उन्नति बाहेर येणार कशी ? मंगल प्रकाश विश्वाला देणाऱ्या अरुणोदया पूर्वीचा हा दाट काळोख--परमेश्वरा. या काळोखांतून आम्हांला प्रकाशाचा रस्ता दिसेल काय ! कां चाचपडत असतां याच स्थितींत कुठेंतरी एखादा धरमधक्का लागून आमचा कपाळमोक्ष होणार ! सत्वगुणाची स्त्री सुखाच्या संसारांत सत्याच

सरळ मार्ग दाखविते, पण तो सत्वगुण आतां आहे कोठें! ( वरून वसंताच्या हातावर थेंबी पडते ) हा पहा सत्वगुण! रक्तासारखा लाल झाला आहे! बिचारी एखाद्या भाडोत्री रंगेलाच्या लहरींत दंग होऊन राहिली असेल! तिला तूर्त सगळी दुनिया कवडीमोल आहे! अभागी पतित स्त्रिये! काय हा तुझा अधःपात! पोटासाठीं शरीराचा विक्रय करायचा यापेक्षां हीन दर्जाची गुलामगिरी दुसरी कोणती? [ पाहून ] यावेळीं इथल्या रस्त्यांतून हिंडणारी ही स्त्रीसुद्धां अशीच कुणी तरी दिसते. हिला दोन शब्द सांगून पाहूं कां? पण काय उपयोग? तूर्त तिला तिच्या चाललेल्या आयुष्य क्रमांतच मोठें सुख वाटत असेल; मक्ते. दारांनीं दारूचा मक्ताच घेऊं नये; परदेशी माल देशांत आणणाऱ्या व्यापाऱ्यां-नींच मालाची आयात बंद करावी, अशाबद्दलची खटपट जशी मनुष्याच्या स्वार्थी दृष्टीमुळें सहजच फुकट जायची, तशीच याही बाबतींत माझी निराशा होईल! ( उमाबाई प्र. क. ) कोण काकू? तुम्ही यावेळीं इकडे कुणीकडे? हें ठिकाण संभावित बायकांना वावरायला फार धोक्याचें आहे! चला, चला, आपण निदान हा रस्ता ओलांडून तरी जाऊं झटपट! कोणीकडे निघालां होतां?

उमा०—वसंत, आपल्या माणसांनींच ही वाट पत्करली तर मग आम्हांला, ही हा धोका सोसून आपली अब्रू क्षणभर गंडाळून ठेवून इकडे यायला नको कां?

वसंत० 'कोणाबद्दल म्हणतां हें तुम्ही?

उमा०''दुसऱ्या कुणाबद्दल बोलायचें? तुझ्याबद्दलच. हो! आज तुम्ही दोघां-ही भांवडानीं घर सोडलं.

वसंत—तें दादांच्याच बऱ्यासाठीं! आमच्यामुळें त्यांना भीति वाटायला नको म्हणून!

उमा—पण घर सोडायचें त्याच्याऐवजीं दादांना भीति वाटायाला लाव-णारा तो उद्योगच सोडला तर? वसंत, आम्हां बायकापेक्षां तुम्ही पुरुष जास्त शहाणे आहां हें मला कबूल आहे. बायकांना तुमच्या बरोबरीनें समजूत यायला अजून अवकाश आहे, हेंही मला समजतें. पण खुद्द टिळकांनीं मुलांना शाळा सोडायला कधीं सांगितल्या होत्या कां! हिंदुस्थानाला स्वराज्य मिळावें अशी तळमळ गांधींच्या जिवाला आहे, तितकीच त्याही पुण्यपुरुषाच्या जि

नव्हती कां ? मग त्यांनीं कां असें कधीं कुणाला सांगितलें नाहीं ? कठीण परिस्थिति आपल्या डोळ्यापुढें दिसतें आहे, यांतून वाट काढायाची ती थोडी दमानेंच काढली पाहिजे. उगीच पी हळद अन् हो गोरी, हें म्हणणें अनुभवानें फोल ठरतें ! क्षय झालेल्या माणसाला आपण बाकीच्या सारख्याच दोन दोन भाकरी खाव्या, चार चार मैल एका दमांत धावावें असें मनांतून कितीही वाटत असलें, तरी वैद्यानें त्याला तसें करूं द्यावें कां ?

वसंत—काकू, तुम्ही पुण्याच्या बायका ! तुमच्या विचारांत अगदींच तथ्य नाहीं असें कसें होईल ? ज्या पुण्याचें पाणी छत्रपति शिवाजी महाराज बाळपणींच प्याले, ज्या पुण्यांतल्या पेशवाईची आठवण पर्वतीच्या पवित्र टेकडीकडे पाहून अजून होते आहे, ज्या पुण्यांत चिपळूणकर शास्त्री लहानाचे मोठे झाले ज्या पुण्यांत गोखले राहिले, टिळक वावरले, त्या पुण्याची पुण्याई कांहीं और आहे ! एकवेळ जेवावें पण पुण्यांत रहावें ! त्याच पुण्याच्या तुम्ही बायका ! आम्हां बाहेर गांवच्या लोकांना वंद्यच आहां. पण काकू तुम्हीच विचार करा, बरोबर असो चूक असो एकदां जो मार्ग पत्करला, तो कष्टाचा वाटतो म्हणून सोडून देणें बरोबर आहे कां ? लोकमान्य टिळकांना त्यांचे प्रतिपक्षी दुराग्रही म्हणून ह्मणत, पण जी गोष्ट स्वतःच्या मनाला सत्य म्हणून पटली ती दुसऱ्याला पटत नाहीं म्हणून सोडणें हें मनाच्या दुबळेपणाचें, भित्रेपणाचें लक्षण आहे.

उमा०--मग महात्मा गांधीं वरचेवर निरनिराळीं तत्वें काढतात हा त्यांचा चंचलपणाच नव्हे कां ?

वसंत०"नाहीं काकू, त्यांना वरचेवर निरनिराळ्या गोष्टी काढाव्या लागतात त्या कांहीं पहिली गोष्ट पटली नाहीं म्हणून तें दुसरी सांगतात असें समजूं नका. त्यांनीं सांगितलेला उपदेश पाळण्याचें सामर्थ्य आम्हां लोकांत अजून आलेलें नाहीं, म्हणून त्यांना दुसरा उपचार करावा लागतो. यावरून महात्म्यांच्या मनाची चंचलता दिसत नसून त्यांच्या जवळ जाण्याची आमची अपात्रता दिसते. लोकमान्य टिळकांचाच दुसरा अवतार महात्मा गांधी हा आहे! लोकमान्यांनीं सांगितल्यापेक्षांहि जास्त स्वावलंबनाचें मार्ग महात्माजींचें आहेत, स्वतःचे उन्नतीनें स्वराज्याचें ध्येय गांठायचें, हा मार्ग लोकमान्यांनाही कबूल होता. फक्त प्रश्न काय तो आज जनतेची तयारी त्या मानानें जाण्या इतकी आहे कीं नाहीं हें ठरविण्याचा होता.

**उमा**—मग आतां अनुभवानें नकारच ठरलाकीं नाहीं. आतां तरी तुह्मी आपल्या मूळपदावर यायला नको कां ?

**वसंत**—नाहीं, काकू आतां परत फिरण्याचें बोलूं नकोस. तत्व पटलें तरी धारिष्ट होत नाहीं म्हणून पुष्कळ थांबले आहेत. आह्मी या मार्गानें पुढें पाऊल न टाकतां मागें फिरलों तर जास्तच अनिष्ट होईल. तत्व सत्य आहे, तत्व अखेर इष्टसाध्य करून देणारें आहे, त्याच तत्वानें चालले पाहिजे. हें कष्ट सोसून आतां आह्मी प्रत्ययाला आणून दिलें पाहिजे; यांत येणारा धोका धारिष्ट धरून सोसायचीं आमची तयारी असेल तरच हें कार्य होणार आहे.

**उमा**—म्हणजे तुह्मी आतां गुत्त्यावर बसून चरकाच फिरवणार म्हणायचा ! अन् ही देशसेवा इतकी खडतर चालल्यावर तुह्मी संसार तरी केव्हां करणार ! गांधीजींचें काय ? त्यांचा संसार झाला आहे. त्यांना मुलें-बाळें आहेत, प्रपंच करूनच त्यांनी हा परमार्थ केला ?

**वसंत**—काकू, आमचा संसार कसा होणार हा प्रश्न विचारण्यांत बायकां पैकीं कोणाचीच या चळवळीशीं सहानुभूति नाहीं असा ध्वनि निघत नाहीं का? आम्ही ज्या वृत्तीनें रहायचें ठरविलें आहे, त्याच वृत्तीनें आमच्याशीं संसार करायला तयार होणाऱ्या तरुणींही आहेत. काळाचा परिणाम पुरुषावर होतो तसाच तो पगडा स्त्रियावरही छाप पाडतोच. गांधी टोपी प्रिय असणाऱ्या पुरुषांच्या जोडीला स्त्रियाही पुष्कळ आहेतच. काकू स्त्रीपुरुषांची जोडगोळी कोणत्याही युगांत अशी जोडीनेंच रहायची.

**उमा**—पण त्या जोडीला एखादेवेळीं परिस्थितीनें विजोड व्हायची पाळी येतेंना ? मी खरेंच सांगूं कां ? तुह्मी सुखा-सुखी इतके दरिद्र्यासारखें रहावें हें मला मुळींच आवडत नाहीं.

**वसंत**—( स्वगत ) काकूचा विचार निराळ्याच दिशेला वळला ? लीले तुझी वृत्ती कायम आहे ! ( उघड ) काकू दरिद्र्यानें दरिद्र्यासारखेंच राहूं नये तर काय उसनी श्रीमंती घटकाभर आणून जन्मभर तो उसना फास गळ्याला लावून घ्यावा ?

**उमा**—पण तुम्हांला दरिद्री व्हावला झालें आहे काय ?

**वसंत**—या सुवर्ण भूमीचे पुत्र आज दरिद्री व्हायला काय झालें ! काय झालें हें आतां कुणालाही सांगण्याची जरूर राहिली नाहीं. सगळ्यांना तें स्पष्ट

**उमा**—हो मला माझ्या मुलीची काळजी वाटलीच पाहिजे ना! तुमचे हे फुकटचे फंद जर असेच चालायचे असतील तर त्यांतच लीलेनें ही तडफडत राहावें असे माझ्या मताला एखादेवेळ पटलें तरी आईचें अंतःकरण तसें करूं देणार नाहीं. तुमच्या या स्थितींत माझी लीला तुमची वायको होणे शक्य नाहीं.

**वसंत**—लीला माझी होणार नाही. यांत लिलेला मी मुकणार.

**काका**—( प्र.क. ) कोण म्हणतो तसें ? वसंत, लीला केव्हांही तुझीच आहे ! लौकिकरितीनें तुम्ही अजून निराळें वागत असलां, तरी तुमची मनें एकरूप आहेत. तुमचें जगांतलें आयुष्यही एकाच मार्गानें जाणार हें सत्य आहे.

**उमा**—या सत्याला मी असत्य करीन वसंत डॉक्टरची डिग्री घेईपर्यंत मी लिलेला देऊं द्यावची नाहीं. मुलीवर माझी कांहींच सत्ता नाहीं कीं काय ?

**काका**—तिच्यावर आंतां तशी सत्ता आपलीही नाहीं, आणि आपल्या नवऱ्याचीही नाहीं. सत्ताच गाजवायची होती, तर ती लहान असतांनांच-तिच्या गळ्याला हें लग्नाचें दावें बांधून टाकायचें होतें. आतां मुलगी चांगली मोठी झाली, आंगाखांद्यावरून पदरसावरून घेतल्याशिवाय बाहेर पडत नाहीं, तिची तिला स्वतंत्र आवडनिवड करतां येऊं लागली, आतां तिच्यावर सत्ता कोण चालविणार ! ती आता वसंताचीच आहे. तिच्या या विचारसरणीलासुद्धां आजपर्यंत आपलाच पाठपुरावा नव्हता कां ?

**उमा**—हो, पण पुढें हें असें होणार म्हणून मला तरी काय बाई माहीत?

**काका**—पुढें काय होणार हें नेहमींच मनुष्याला कळतें तर त्याच्या जन्मांतल्या किती तरी अडचणी आपोआप दूर झाल्या असत्या, आणि हेंच सांगण्यासाठीं इथवर येण्याचें श्रम घेतलेतकां ? फुकट-फुकट झाला हा उद्योग. चला आतां घरचा रस्ता सुधारा ! नाहीं तर थांवा मीच येतों आपणाला चांगल्या वाटेला लावायला. मुलीच्या कल्याणाच्या विचारांत आपण येतानां इथपर्यंत आला पण आतां डोळे उघडल्यानंतर या रस्त्यावरच्या छिनाल दारूवाज लोकांच्या प्रसादाचा सहज आपल्याला लाभ व्हायचा; तो रुचणार नाहीं. चला-मी आपल्याला वाट मोकळी करून देतो [ काका व उमा जातात ]

**वसंत**—( त्यांकडे पहात ) मुलीला सुख लागावें म्हणून ना कांकूचा हा सारा खटाटोप ! मग लिले, तुझें सुख अंतःकरणाच्या प्रेमांत खरोखरच नाहींका?

**वसंत**—अजून नाहीं नीट उलगडा होत !

**बाळ०**—आतां उलगडा काय कपाळाचा व्हायचा राहीला आहे ! या माडया, त्या कोपऱ्यांतलें तें दुकान. या भागांत यावेळीं अशाळ भूतासारखा हिंडणारा माणूस कोणत्या हेतूनें आला आहे हें का कुणाला सांगावें लागतें, या गोष्टीं समजायच्या असतात. या गोष्टी मनानें ओळखायच्या असतात बोला आतां—आतां तरी खूण पटली कीं नाहीं ! तुम्हाला एकटयाला जायला संकोच वाटतो म्हणून मीहि तुमच्याबरोबर यायला तयार झालों. बोला आतां आणखी उलगडा तो काय व्हायचा–बोला आतां.

**वसंत**—म्हणजे तुम्ही मला वेश्यांच्या माडया चढणारा, दारू पिऊन गटारांतल्या खातेऱ्यांत लोळणारा हलकट पशू समजला काय ?

**बाळ०**—अहो तुम्ही माझ्यासारखे चांगले चालते बोलते मनुष्य मी तुम्हाला पशू कसा समजेन ! पशू स्वतः कधी दारूही पीत नाहींत अन या माडयाही चढत नाहींत. रागावूं नका. मी त्यातलाच आहे. माझ्याकडून हें गुपित बाहेर फुटायची भीति नको अहो जगांत सगळें हेंच चाललें आहे. दिवसाच्या वेळेला संभावित म्हणून चमकणाऱ्या आणि रात्रीं राजरोस या माडीवरून फिरणाऱ्या किती पगडया तुम्हांला दाखवून देऊं ! बोला आतां. तुम्ही यांत पडलां म्हणून बाहेर तुमच्या लौकिकांत काडीइतकाही बाध यायचा नाहीं. तशीं तुमची कुणी अलाच फजीति करण्याला तर तुम्ही बेलाशक मला पुढें करा म्हणजे मग ओढतो एकेकाची पगडी—

**वसंत**—पुरे करा बाळकोबा. मी तुम्हाला आजपर्यंत नुसत्याच मूर्खांच्या कोटींत वसवीत असे. पण तुमचा मूर्खपणा इतक्या थराला गेला असेल अशा मला कल्पनाहीं शिवली नव्हती. अरे जनाची नाहींतर मनाची तरी काहीं शरम! आणि पुन्हा पाजीपणाला पाठिंबा म्हणून लोकाच्या पगडया पाडतां, काय म्हणावें तुम्हांला !

**बाळ०**—व्यवहार चतुर म्हणावें आम्हांला! वसंतराव तुम्ही खरेच घाबरला. जाऊंद्या आज नाहीं तर पुन्हां केव्हातरी, आहेतच आपल्या गाठी भेटी वरचेवर— [ जाऊं लागतो ]

**वसंत**—तिकडे कुठे निघाला! घरचा रस्ता तो नव्हे !

**बाळ०**—बस्स ! आमची पंचाईत करण्याचें तुला काय कारण ! आम्ही

तिकडे जाऊं इकडे येऊं वर जाऊन बसूं नाहीं तर खालीं लोळत पडूं! तूं कोण विचारणार!

**वसंत**—मी कोण? मी तुमच्या सारखाच एक मनुष्य आहे!

**बाळ०**—आमच्या सारखा असलास तर चल आमच्या बरोबर!

**वसंत**—मी तुमच्या बरोबर न येतां तुम्हालाच माझ्या बरोबर नेणार आहे. मी नुसत्या माणुसकीच्या हक्कानें बोलत नाहीं, मी तुमचा देशबंधु भाई-।द आहे. तुम्ही बेशुद्ध झालां अहां तरी मी शुद्धीवर असल्यामुळें तुम्हाला रवतीकडे जाऊं देणार नाहीं!

**बाळ०**—भाऊबंद! चांगलीच भाऊबंदकी गाजवायला लागलाकी! इंग्रज सरकारच्या राज्यांत व्यक्ति स्वातंत्र्य प्रत्येकाला आहे आम्ही वाटेल ते करूं.

**वसंत**—वाटेल तें करूं देण्याइतकें व्यक्तीस्वातंत्र्य या राज्यांत तरी खास नाहीं. तुम्हीं आपला गळा या स्वातंत्र्याच्या चक्रावर कापून घेऊं लागाल तर तुम्हाला तसें करतां येणार नाहीं. मद्यपानांत, वेश्यागमनांत, आत्महत्येचा दोष तर तुमच्या कपाळीं येतोच. पण शिवाय तुमच्यापुढें दुसऱ्याहि व्यक्तीच्या जन्माचें मातेरें होत असल्यामुळें त्या मनुष्य वधाचाही गुन्हा आपल्या आंगाशीं लागणार आहे. बाळकोबा, तुह्मी या मार्गापासून परत फिरलें पाहिजे. मी तुह्माला आतां क्षणभरही इथें राहूं देणार नाहीं!

**बाळ०**—काय करणार मला तूं? मी गुत्त्यावर दारूचे पेलेही उडविणार आणि माडीवर मजा मारणार!

**वसंत**—मी तुह्माला यांतले कांहींएक करूं देणार नाहीं.

**बाळ०**—मी दोन्ही गोष्टी करणार? पाहूं या मला कसा अडवितोस तें?

**वसंत**—मारामाराची ऐट माझ्या पुढें चालवूं नका! व्यसनानी पोखरलेल्या तुमच्या शरीरांत काय सत्व उरलें आहे? माझ्या हातची एक थप्पड बसेल तर शेवटलें पाणी प्यायलासुद्धां संधी सापडणार नाहीं!

**बाळ०**—(स्वगत) इतकेंच पुरें वाटतें? नाहीं तर एखादे वेळ प्रत्यक्षच प्रयोगाची पाळी यायची! (उघड) मला माराची धमकी देतोस काय? थांब तुला दाखवितों—आतां जाऊन पोलीसांत वर्दी देतों.

[ पोलिस! पोलिस म्हणून ओरडत जातो. ]

**वसंत**—गेला विचारा पोलीसच्या नांवानें सारखा शंक करीत निघून गेला ! हा बाळकोबा इतका भकला असेल अशी मला खरीच कल्पना नव्हती. वरून चांगला साळसूद दिसत होता, पण या साळसूद माणसाला सावळा गोंधळ घालायला शिकविणारा आमचा सावळाराम सगळी अक्कल सावरून बसला आहे ना ? सावळारामाचा स्वार्थ अन् त्याला बाळकोबाच्या बावळटपणाचें साधन ! ठीक ! असल्या चतु:ष्पादांना चौफेर घेरून त्यांना चकरा चारून स्वत:ची चैन चंमन चालविणारे चंडोल या चवचाल दुनियेत किती तरी आहेत. ( पाहून ) चला गुत्ता तर बंद झाला. पण या गुत्यांतून रंगून बाहेर पडलेले हरीचे लाल रात्रभर कुठें तरी लोळत पडतात, तों इकडे हें माडीवरचे गुत्ते रात्रभर उघडे राहून इथें दंगल उडत असते, भलत्या भ्रमांत भकत चाललेल्या या स्त्रियांनीं निर्वाहाला जगांत दूसरें साधन नाहींच कां ? मद्यपानाचें पिकेटिंग सुरूं होऊन तें बऱ्याच अशानें यशस्वीही झालें, त्याच सेवकांनीं रात्रींच्या वेळीं या दिशेनें थोडासा प्रयत्न केला तर ! वाट चुकलेल्या या गायी संसाराच्या कुरणांत पुन्हां नेऊन सोडल्या तर ? हें पिकेटिंग अगदींच सहज होईल. बाळकोबाच्या म्हणण्याप्रमाणें या फंदांत जर खरोखरच कांहीं पगड्या पडल्या असतील. तर त्या या चळवळीला सुरवात झाल्या बरोबर निदान अब्रु साठीं तरी खास बाजूला होतील ? सरकारच्या अबकारीचें उत्पन्न जसें मद्यपानाच्या आड येतें, तसें यांत कांहींच भय नाहीं. या इतक्या शेकडोशें स्त्रिया शांतपणानें सन्मार्गाला लागतील. पोटासाठीं दुसरे उद्योग धंदे करूं लागतील, तूर्त महात्माजींच्या उपदेशाप्रमाणें चरक्याला जरी वाहून घेतील तरी केवढे कार्य होणार आहे ? म्हातारपणच्या या स्त्रियांच्या यातना आपोआप चुकून समाजाचा माथा एका परीनें उजळ होईल ( पाहून ) तूर्त मला या यातना सोसायला तयार झालें पाहिजे. बाळकोबा पोलिसाला घेऊन येताहेत. पोलिस तो तरी विचारा काय करणार, पोटासाठीं ह्या नोकरीचा काटा सारखा टोचत ठेऊन आज आमच्या बांधवांना दिवस काढावे लागताहेत. परमेश्वर पाठीराखा—कोणाचा ? गरीब हिंदवासीयांचा परमेश्वर आज कोठें दडी मारून बसला आहे कोण जाणे ? या बाळकोबा—

**बाळ०**—( शिपायासह प्र. क. ) शिपायास हाच तो वसंता, वसंतराव अनुभव घ्या, मला फार वाईट वाटतें, पण कायद्यापुढें कोण काय करणार ?

**शिपा**—वसंत, तुला चौकीवर फौजदारानीं बोलावलें आहे.

**वसंत**—ठीक आहे, चला चौकीवर चला. मलाही रात्रीपुरती वस्ती जागा पाहिजेच होती.

**काका**—( प्र क. ) अरे वसंत जरा थांब, हा काय प्रकार आहे तें मला एकदा नीट सांगा छे हा तर चाललासुद्धां [ वसंत बाळ शिपाई जातात. आतां आपणच जाऊन तपास केला पाहिजे. [ पडदा ] त्यांच्या मागून जातो.

---

# अंक तिसरा.

## प्रवेश—पहिला.

[ काकांचें घर—काका व उमाबाई ].

**काका**—बस्स ! पुरे करा आपलें हें बोलणें. तुम्हांला कांहीं माणुसकी आहे कां ? अन् त्या माणुसकींत आपला शब्द खरा करण्याची जबाबदारी माणसावर असते ही गोष्ट लक्ष्यांत आहे कां ? काळ नाहीं वेळ नाहीं, मनुष्याचें मन कोणत्या अडचणींत आहे इकडे लक्ष्य द्यायचें नाहीं, आपली लागली लहर की झाली बडबड सुरू !

**उमा**—पण इतकी अगदीं डोकींत राख घालण्यासारखें यांत माझें पाप काय झालें तें तरी कळूं द्या ?

**काका**—मी डोकींत राख घालणार नाहीं ! तुम्हाला काय ! तूर्त तेंही पथ्या-वरच पडणार आहे. तुमच्या राख फासून मी संसार सोडला म्हणजे पोरीची आपल्यामनाप्रमाणें वाट लावायला आपल्या आपण पूर्ण मुखत्यार व्हाल. पण मला तें इष्ट नाहीं ना.

**उमा**—कायतरी बाई कांगाव आणायचा चाललाय हा ? कुठें दोन शब्द बोललें, जरा मर्जीला पटलें नाहींत तर लगीच आपलें संसार सोडायला पाहिजेन् आम्हांला मुखत्यारी येणार, एक गोष्ट बोलून पुरली नाहीं. पण मलाही राग आणतां येतो म्हटलं ! तसेंच तो दुसऱ्यानें खरा आणला कीं खोटा आणला आहे हेंही पण मला कळतें ! दोन शब्दावर हें केवढं तरी पुराण.

**काका**—दोन शद्बावरचें पुराण! विष यातें या दोन्हीचा एक शद्ब झाला त्यावर चंद्रहासाच्या आयुष्याचें पुराण झालें. पण नुसत्याएका अक्षरानें—आनंदीबाईने 'ध' चा 'मा' केल्यामुळें—नारायणराव साहेबांच्या पुढलें पेशवाईचें सगळें पुराण पार बदलून गेलें ना! एका अक्षरानें सगळी कलागत लावून देऊन घर बुडविलें. आपलेही दोन शद्ब माझ्या प्रपंचांत तसेच महत्त्वाचे आहेत. त्याच दोन शद्बांच्या बऱ्यावाइटपणावर आपलें पुढल्या जन्माचें सुख दुःख अवलंबून आहे असें राणीसाहेब, आपल्याला नाहीं कां वाटत? लीलेचें लग्न हे दोन शद्ब पण त्या दोन शद्बावर आपल्या या राज्यांतील तीनही जीव घुटमळताहेत. लीलेचें लग्न सुखासमाधानाचें झालें, आपल्या हौशीप्रमाणें न झालें, तरी तिच्या मनाच्या कलाप्रमाणें झालें. तिचा संसार आनंदांत चालूं लागला म्हणजे आमचाही जीव निश्चित होणार आहे. लीलेचें लग्न हे दोन शद्ब आपण जितके सहज बोलूं शकलां त्या दोन शद्बांतली गोष्ठ जितकी सहज रीतीनें करून टाकावी असें आपण भासविलें, तितकी सहज होण्यासारखी ही बाब नाहीं. लीला जगांत जन्माला आल्यापासून लीलेचें लग्न माझ्या मनापुढें सारखें लागून राहिलें आहे! दोन शब्दावरचें हें आमच्या तुमच्या आणि तिच्या जन्माचें पुराण आनंदमय, काव्यमय व्हावें म्हणून माझी आरंभापासून योजना आहे व तशी खटपट आहे.

**उमा**—मग म्हणूनच माझ्याही म्हणण्याचा जरा शांतपणानें विचार करयचा होता. आपल्या लाडक्या लीलेचें लगीन एखाद्या सुलक्षणी लक्ष्मींपुत्राशीं लागावें हेंच ना माझें म्हणणें.

**काका**—म्हणून कां तिची आवड निवड न पाहतां वेलाशक एखाद्या खुळचटाच्या पदरीं आपली पोर बांधून जन्मभर तिचे शिव्याशाप घेत बसूं म्हणतां! लक्ष्मीच्या विलासापेक्षां बुद्धीच्या, प्रेमाच्या विचारांनाच जास्त महत्व द्यायची शिकवण तिला मुद्दाम घालून दिली. लफ्फा, चंद्रहार, तन्मणी, बिंदी असल्या हिऱ्या मोत्यांच्या दागिन्यांनीं सजून एकाद्या अक्कलशून्य श्रीमंताचें सौभाग्य कपाळीं लावून घेण्यापेक्षां साध्यासुध्या पोषाखांतच नटूनथटून तरतरीत अशा तेजस्वी तरुणाचा गरीबीचा संसार करण्यांतच मनाचें खरें सुख आहे अशी तिची समजूत होऊन तिचें मन त्यादृष्टीनें विचार करीत करीत एका ठिकाणीं ठरल्याचेंही आपल्याला दिसतें आहे. आणि आतां तिला तेथून खेचून आणून तिला लक्ष्मीकडे लोटून देणार! वा?

**उमा**—बोलून चालून ती लहान पोर, तिला जगांतलें कळतें आहे काय? आपण तिची दृष्टि जशी वळवावी तशी वळणार.

**काका**—या बाबतींत तूर्त तरी तुमचा आमचा मतभेद राहणार असें दिसतें. त्याचा आपण विचारच सोडून देऊं. मला माझ्या उद्योगांत या गोष्टीची वाटाघाट करायला आज सवड नाहीं. आणि मला वाटतें पोरगीही कांहीं आजच अगदीं पाठीशी लागलेली नाहीं, कसें तरी माझें लग्न कराच एकदां म्हणून.

**उमा**—इश्श! हें काय बोलणें तरी? ती आतां लहान कां आहे! तिला सार समजतें हो!

**काका**—समजतेंना! मग तिलाच विचारून ठरवूं म्हणजे झालें! तिला जगांतलें काय कळतें असें क्षणापूर्वी म्हणणाऱ्या आपणच आतां तिच्यावर सगळी समजूत लादूं लागला. आहे काय हा प्रकार?

**उमा**—मला नाहीं कांहीं कळत. असें पावलोपावलीं बोलण्यांत अडवायचें, बरी आपलीं वकीली तूर्त चुलीपुढें बायको जवळच चालली आहे!

**काका**—हो, घरच्या कोर्टांत ही अशी सवय ठेवली म्हणजे बाहेर अडचण पडत नाहीं. माझी वकीली—

**लीला**—(प्र. क.) काका, दादा आले आहेत दाराशीं—

**काका**—अग मग त्यांना आंत नाहीं कां आणायचें? तुझ्याआई सारखीच तूंही वेडी झालीस कां! मुलगी बापाच्या वळणावर जात असते ना? थांब, मीच जाऊन त्यांना घेऊन येतों इकडे [जातो]

**उमा**—[लीलेला पोटाशीं धरून] लीले तुझें कसें ग होणार? माझ्या जिवाला सारखी हुरहुर लागून राहिली आहे. माझी बाळ ती! तूं आताशीं पहिल्या सारखी हंसत नाहींस, खेळत नाहींस. काय होतं तुला?

**लीला**—काय व्हायचें आहे मला, चांगली खातें, पितें सगळं कांहीं यथास्थित चाललें आहे. आईसाहेब आपल्या राज्यांत माझें कसें होईल याची काळजी करण्याचें कारणच नाहीं. पण आपल्यालाही कांचनभट्टी सहानुभुति आजच कुठून आठवली? कां मलाही एखादा भुजंगनाथ काढला आहे हुडकून? पण आईसाहेब, काकाची लीला म्हणजे भटाची शारदा नव्हे, हें लक्ष्यांत आहे ना?

उमा—माझ्या लक्ष्यांत सारें कांहीं आहे बरं ! तुझें हें टोचून बोलणें मला कळत नाहीं असं कां तुला वाटतं ?

लीलाः—मला कसें वाटतें याच्याशीं तुला काय करावयाचें आहे ? तुझी मात्र आताशी पैशावर फार नजर आहे एवढें खरें. काका जसेजसे गरीबीचा विचार करायला लागतात, तसतशी तुझी आशा श्रीमंतीकडे वळायला लागली आहे. अन् या गरीबी श्रीमंतीच्या झगड्याचा परिणाम—या दुहेरी सत्तेचा परिणाम–माझ्यावर होतो आहे. बाकी याला तुम्ही तरी काय करणार म्हणा.

उमाः—काय बोलतेस हें तुझें तुला तरी समजलें कां पुरतें ? गरीबी कायन् श्रीमंती कायन् यांचा झगडा कसला चाललाय् ? तुझें डोकेंच ठिकाणावर नाहीं मुळीं.

लीलाः—डोकें आहे आपल्या ठिकाणावरच अजून. आणि जोंपर्यंत त्याच्या वरचा मार सोसण्यासारख्या स्थितींत आहे तों पर्यंत तें आपलें ठिकाण सोडणारही नाहीं. इतकेंच काय, पण आंतून जरी त्या डोक्याची कितीही खळवळ उडत असली, तरी बाहेरून तें आपल्या दृष्टीला पहिल्यासारखेंच दिसत जाईल. आईसाहेब, माझ्या डोक्याची काळजी स्वतः घेण्याइतकी मला अक्कल आली आहे.

उमाः—बोल बाई, तूं तरी कमी कां करशील ? आईचें अंतःकरण, बापकोची प्रापंचिक बुद्धि, या गोष्टी उद्यां तुझ्या तुला कळूं लागल्या म्हणजे मग तूंही माझ्यासारखीच धडपड करशील. तवर चालूं द्या तुमचं !

लीलाः—परसदारीं कुणी हाका मारतंय्से वाटतें ! (मोठ्यानें) कोण आहे तें ? आले हो ! [जाते.]

उमाः—माझं बोलणें घरांत दोघांनांही पटत नाहीं. यानां मी विषासारखी वाटतें. मला तरी वसंतासारखा जांवई नकोसा कां आहे ? पण अलिकडे त्याची बुद्धिच फिरली ! काळच मोठा कठीण आला आहे. कुणाला ठाऊक उद्यां काय होतयतें ! नाहीं तर आपलें हें ब्रह्मचर्याचें नवें वेडच आणखी डोक्यांत शिरायचें ! (पाहून) सगुणाबाई द्या ! आज नवराबायकोंनीं दोहोंकडून येऊन ही आपली ओव्हरजत्राच आणली म्हणायची ! आमच्या घरीं काय बेत आहे कळत नाहीं ! नेहमीसारखे सहज आले-असतील-हो, पण आज वसंतावरच

खटला सुरू व्हायचा होता नाहीं कां? मग बरोबर-( मोठ्यानें ) थांबा अं बसा! मी ही आलेच. [जाते. काका व त्रिंबकराव प्र. क.]

**काकाः**—( त्रिं. स सावरीत ) दादा, दादा, हें काय-लहान पोरासारखें? जरा मन आवरायला पाहिजे. पुसा-पुसा ते डोळे. अहो प्रपंचांत प्रसंग हा प्रत्येकावर आहेच ना? धीर धरूनच काळाची वाट लावली पाहिजे.

**त्रिंबकः**—काका, मला मन मोकळें करून बोलायला-रडायला सुद्धां हो परमेश्वरानं जागा ठेविली नाहीं. पोरासारखें रडायला थोरपणीं शरम वाटतें-आतून उमाळे येत असले तरी अस्से दाबून वर वर शांतपणें व्यवहार संभाळावा लागतो-काका, आतां या वयापर्यंत सुखांत संसार केला, त्याच्या अखेरीला हा घोटाळा झाला—

**काकाः**—यांत तसें वाईट वाटण्यासारखें कांहीं नाहीं. अहो या चळवळीच्या काळांत असल्या खटल्याबद्दल सगळ्यांची सहानुभूति असते आणि तसें पाहिलें तर यांत दुर्लौकिक व्हायचें कारण तरी काय? वसंतानें कांहीं कुणाचें घर लुटलें नाहीं, किंवा कुणा कुलवंतीची अब्रू घेतली नाहीं, यांत नीतिविरुद्ध असें काहीं एक नाहीं. ‘आपले तोंड काळें झालें! घराण्याची अब्रू गेली!’ असें तुम्हीं समजण्याचें कांहींच कारण नाहीं. दादा हा काळाचा महिमा आहे. ज्या गोष्टी करण्याबद्दल लोकांचा धन्यवाद मिळतो, त्याच गोष्टी राजाला अनिष्ट असतात. राजा आणि प्रजा यांचें सामान्य हित साधावयाचें हें ध्येय आतांशीं अशक्य कोटींत जाऊन बसायला लागलें आहे.

**त्रिंबकः**—बाहेरचा व्यवहार कसाही असला, लोक कांहींही म्हणत असले, तरी मी माझ्या सख्या भावाला आज पारखा झालों. त्याच्याबद्दल जीव कळकळत असला तरी उघड एक शब्द बोलायची किंवा त्याच्याकडे प्रेमानें पहायची आज मला चोरी होऊन बसली! असा हा खडतर सेवाधर्म—काका, तुम्ही मात्र त्याला पाठीशीं घेऊन मला जन्माचा ऋणी करून ठेवलें.

**काकाः**—बरं. तें ऋण फेडून घ्यायची माझी मीं व्यवस्था पाहीन. तुम्ही नका त्याची काळजी करूं!

**त्रिंबकः**—काळजी नको म्हणून किती समजूत घातली तरी मन कुठें रहातें आहे? या बाहेरच्या बंधनांनीं हातपाय जरी जखडून जाऊन देह स्वस्थ बसला तरी मन पोरामागें धावत जातेंच! ताईची काय अवस्था असेल, वसंताची

स्थिति कशी असेल? त्यांना खायाप्यायला कुणी देत असेल कां नाहीं ! पोरें या प्रसंगानें धावरून गेलीं असतील-एक ना दोन-हजारों तर्कवितर्क मनांत येऊन मन भांबावून जातें ! असें वाटतें कीं नको हा जीव !

काकाः—दादा, खरचें सांगतों तुम्हांला, तुम्ही चित्त जरा स्वस्थ ठेवा. त्रास करून घेऊन कांहीं उपयोग आहे कां ! तुम्हांला एक तुमचीं बंधनें आडवीं येतात, मला तर तशी कुणाची भीति नाहींना? मी त्याची सगळी व्यवस्था करतों आहे. दादा, तुमचा रक्ताचा संबंध-तुम्हांला तुमच्या भावंडांबद्दल काळजी वाटायचीच. पण मलाही त्या दोघांबद्दल आपलेपणा वाटतो आहे. वसंतावर माझें स्वतःच्या मुलासारखें प्रेम आहे-तुम्हांला जास्त सांगायला नकोच. खटल्याला सुरवात झाली आहे, आज प्रॉसिक्यूशनतर्फे पुरावा झाला.

त्रिंबकः—मग त्या पुराव्यांत आहे कां कांहीं आशा ? मी आतां हाच तपास घ्यायला आलों होतों. म्हटलें तुमच्याकडे उघड आलें गेलें तरी सुद्धां तेवढ्याची पाळत ठेऊन लगेच रिपोर्ट व्हायचा. तेव्हा आपलें जरा दिवस बुडाल्यावर मगच—

काका—दादा तुम्ही फारच भितां बुवा. अहो, इतक्या बारीकसारीक गोष्टीला आतां सरकार महत्व देत नाहीं. पूर्वी स्वराज्याचा स्व हा शब्द उच्चारणाराच्या पाठीमागेंसुद्धां पोलिसचा लकडा असे. पण आतां काळ बदलला. खुद्द बादशहांनी जेथें आमच्या हातावर स्वराज्याचा संकल्प सोडला, तेथें आतां या चळवळींत राजद्रोह राहिला कोठें? प्रश्न काय तो कालावधीचा राहिला आहे. तो मंगल दिवस उगवायला अजून अवकाश आहे म्हणून एक प्रकारचे पक्षी कल्लोळ माजवीत आहेत, तर त्या दिवसाच्या उदयाची लाली आकाशांत दिसूं लागली आहे असें सांगणारे दुसऱ्या एका जातीचे पक्षी गीतें गाऊन जनतेला जागे करताहेत. या गोंधळाच्या गलबल्यांत, या किलकिलाटांत, तुम्ही मुळीच भिऊं नका. आतां नाहीं तर थोडयाशा काळानें कां होईना उजेडणार हें खास आहे.

त्रिंबक—कोणाला ठाऊक तो उजेड पहायला आम्ही जगतों कीं त्याच्या आधींच कळोखांत बुडून मरून जातो तें ! तूर्त या गजबजाटांत वसंतासारखीं नवखीं पोरें मात्र अर्धवट झोपेंत जागीं झाल्याप्रमाणें अंथरूण सोडून इकडे तिकडे रडत हिंडायला लागलीं एवढें खरें.

काका—त्यांनाही आपणच हाताला धरून नीट आंथरूणावर आणून

सोडलीं पाहिजेत. त्यांच्या रडण्यानें घाबरून आपणही रडूं लागलों तर तें आपल्या वडीलपणाला साजणार नाहीं. वसंताची तुम्ही आगदी काळजी करूं नका. जज्ञ चांगला समजूतदार माणूस आहे. विरुद्ध बाजूचा मुख्य जोर काय तो पिकेटिंग नानकोऑपरेशन, यांवर आहे. न्यायाच्या कोर्टांत या शद्बांवर शिक्षा देण्याचेही दिवस संपत आले आहेत. नसले तरी आह्मी तें लवकरच संपवू असा आह्माला विश्वास आहे.

**त्रिंबक**—पहा, आतां तुह्मीच काय कराल तें खरें! मी तुम्हांला जास्त तें काय सांगणार! वसंत माझा नव्हे. काका, तो तुमचा आहे, एवढें लक्षांत ठेवा.

**काका**—पहा, पुन्हां तुमचे डोळे पाण्यानें भरून येऊं लागले! दादा, तुमचे अंतःकरण फारच कोवळें बुवा.

**त्रिंबक**—परीस्थितीशीं टकारा खातांखातां त्यांत टणकपणा राहिला नाहीं. काका ही दोन भावंडें ही अर्भकें आईच्या मागें मी पोटच्या लेकरासारखीं जतन केली-त्यांचें हें चाललेले हाल पाहून काळीज तिळ तिळ तुटतें हो! काय करूं? आज चार दिवस घरांत सुचत नाहीं, आफिसांत गैरहजर राहिलों तर उगाचि संशय यायचा म्हणून आपला जाऊन कांहीं तरी काम करतों; पण कशावर लक्ष म्हणून नाहीं. कुठेंही पहात असलों तरीं, कांहींही करीत असलों तरी, डोळ्यापुढल्या आपल्या त्या दोन मूर्ति कांहीं केल्या हलत नाहींत. बरे आहे येतों मी. फार वेळ बसलों तरी तें ही ठीक नाहीं.

**काका**—या, अन् त्यातले त्यांत जरा शांतवृत्ति ठेवण्याचा प्रयत्न करा. अहो शेवटलें ब्रह्मास्त्र-परमात्म्यानें ज्याचे रक्षण करण्यासाठीं सुदर्शन हातीं धरलें त्याच्या वाटेला कोण जायला समर्थ आहे—हें आपलें लक्ष्यांत ठेवा. आणि त्या परमेश्वराचीच प्रार्थना करीत जा (पाहून) आंत वहिनीही आल्या आहेत वाटतें! कां वहिनी, दादांना क्षणभरसुद्धां सोडायचें नाहीं, म्हणून हा पहारा आहे कीं काय? (उमा, लीला, सगुणा बाहेर येतात) दादा, पहा वहिनीकडे पहा, किती चर्या शांत, गंभीर आहे! खरी सगुणा ही! वहिनी तुम्ही नाहीं कां दादांची समजूत घालीत! ते उगीचच त्रास करून घेताहेत.

**सगुणाः**—काका, मी इकडे सांगण्यासारखा माझा अधिकार तो काय तुम्ही बरोबरीची मंडळी, बोललां ते शोभून गेलें.

**काका**—पण इतर मंडळीच्या तासन्तास बोलण्यानें जो परिणाम मनांवर

होत नाहीं, तो बायकांच्या समजूतदार सहानुभूतीच्या एका दृष्टिक्षेपानें होऊन जातो. मी तुम्हांला सांगायला नकोच म्हणा.

**त्रिंबक**—खरोखरच तुम्हीं न सांगतां सुद्धां इथें कित्येक वेळां असा परिणाम झालेला आहे. माझ्या संसाराला सगुणा स्त्री मिळाली हें खरोखरच मी मोठें भाग्य समजतों स्वतःचें.

**लीला**—झालं! सगुणा वहिनीला गृहिणीपदाचें सर्टिफिकीट खुद्द दादांच्या तोंडचें मिळालें. वहिनी आज होम युनिव्हर्सिटीची ग्रॅज्युएट् झाली! काका, या पदवीदान समारंभांत तुम्हीही आईला देऊन टाका ना एक असलेंच सर्टिफिकेट!

**उमा**—बरें बरें, आपला वशिला नको बरें कां!

**काका**—संसारांत मुलें झाल्या नंतर पुढच्या परीक्षांची सगळीं सर्टिफिकीटें त्या मुलांच्या वशिल्यानेंच त्यांच्या आयांना मिळायचीं असतात. दादांच्या पाठचीं मुलें वहिनींनीं पोटच्यासारखीं वागवलीं म्हणूनच त्यांची आज अशी वाहवा झाली.

**उमा**—लोकांसमोर एकदां शोभा करायची राहिली असेल तर तेवढी ही हौस फेडून घ्यायची होती.

**काका**—माझी तशी हौस होईल तेव्हां या लोकांना मी मुद्दाम बोलावून आणीन. तूर्त आपण हा विषय आटोपता घेऊं, आणि दादा निघाले त्यांना घरापर्यंत कंदील दाखवायाला कोणी जायचें, हें ठरवूं!

**सगुणा**—नको. इथे समोर जायचें, त्याला कंदील कशाला! जातों आम्ही तसेंच.

**लीला**—असलीं कामें करायला तरुण पिढीनें स्वयंसेवक म्हणून पुढें यावें लागतें ना? चला मी येतें तुमच्या बरोबर.

[ त्रि. सगुणा, लीला जातात, ]

**उमा**—देवापाशीं संध्येचें मांडून ठेवलें आहे, पोरगी येईपर्यंत तेवढी संध्या उरकून घ्यायची होती.

**काका**—हुकूम बजावायला बंदा हजर आहे [ जातात ]

## अंक तिसरा—प्रवेश दुसरा

[ स्थळ—रस्ता. बाळकोबा व सावळाराम प्र. क. ]

**सावळा**—अरे वा! बाळकोबा, हें काय सोंग साजिवलें आहे तुम्ही आज?

**बाळ०**—सोंग! बापू तुम्ही माझ्या या पोषाखाला सोंग समजतां! मला वाटतें, तुम्ही गोखल्यांना किंवा टिळकांना स्वर्गापर्यंत पोचवायला गेला होतां ते आजच या लोकीं परत आलांत. अतां हा महात्मा गांधी सांप्रदायाचा पोषाख! ही टोपी हा गुडघेघोळ, छातीच्या खालीं एकच खिसा असलेला कफनीवजा सदरा, हें खादीचेंच धोतर हा पोषाख तुम्हाला नवखा वाटतो? आश्चर्य आहे! भाई, येही आजकालकी फॅशन है!

**सावळा**—असेल! पण या फॅशनला आजच गळ्यांत बांधण्याइतका तुम्हांला हिचा कळवळा येण्याचें कारण? कां भेटला कुणी गुरु?

**बाळ०**—माझे गुरु एकच, आणि ते आपणच; बापू गुरुला मोक्षगुरु म्हणतात, कारण त्या गुरुच्या उपदेशानें शिष्याला मुक्त व्हायचें असतें, मोक्ष मिळवायचा असतो, पण मी तुम्हांला बंधनगुरु म्हणणार; कारण तुमच्या उपदेशानेंच मला या संसारबंधनाचा मार्ग दिसणार आहे.

**सावळा**—पण मी तर तुम्हांला या गांधी सांप्रदायांत शिरायला केव्हांच सांगितलें नव्हतें.

**बाळ०**—आणि मी तरी त्यांत शिरायला कुठें लागलों आहे? आपला हा मिसळ सांप्रदाय-आपण पोषाखांत गांधी, बोलण्यांत टिळक, आणि वागण्यांत गोखले आहों असें तुम्हींच मला सांगितलें ना? हॉटेलांतल्या मिसळीवर झोड मारीत असतांना हा तुमचा उपदेश मला मिळाला म्हणून मी लगेच आपल्या सांप्रदायाला तेंच खमंग, खुसखुशीतसें नांव ठेवून दिलें.

**सावळा**—पण तुम्ही आज तर प्रत्यक्ष गांधीसारखेच दिसतां आहां बुवा.

**बाळ०**—दिसतां? तुम्हालाही दिसतों आहे कां! मग माझा उद्देश खास सिद्धीला जाणार! सारखा डोकें खाजवून खाजवून हा पोषाख तयार केला. हटलें देवानें आपल्याला चेहेऱ्यांत वैषम्य ठेवलें असेल त्याला उपायच नाहीं; ण वरचा झोक सगळा खुद्द महात्माजींचाच झाला पाहिजे! पहिल्या दर्शना गच खुद्द महात्मा पुढें उभे असल्याप्रमाणें पाहाणाऱ्याला वाटून छाप बसली पाहिजे.

**सावळा**—पण यांतला हेतू?

**बाळ०**—हेतू! हेतू काय हे तू कां मला विचारायला पाहिजे? हेतू जो पहिला तोच दुसरा, अन् तोच तिसरा ही! आपला हेतू काकांच्या घरांतलें स्वराज्य

दिलेंस ! तूं खास शतायुषी होणार माझा तुला आशीर्वाद आहे. ( एकीकडे ) पण वरानें आपल्या भावी वधूला आशीर्वादच द्यायचा असतो कां ?

**लीला**—पण या अशा वेषांत इकडे—

**बाळ०**—( स्व. ) इकडे ! बायका नवऱ्याबद्दल ' इकडे ' ' तिकडे ' च करतात ! आहे, यशाचा रंग आहे ! पोषाखानें बरेंच काम केलेसें दिसतें ! ( उघड ) वेषावर तुझी बरीच नजर दिसते ! लीले, हा वेष-महात्म्यांच्या प्रसादाचा हा पवित्र पोषाख—' अपवित्रः पवित्रो वा ! '

**लीला**—इथें उभ्या उभ्याच संध्येला सुरवात झाली कां ?

**बाळ०**—( स्वः ) हो, हा संध्येच्या आरंभाला म्हणतात नाहीं कां ? चकलें तरी सावरून घेतलें पाहिजे ! ( उघड ) लीले, तूर्त हा हिंदुमुसलमानांच्या एकीचा काळ आहे, म्हणून मुसलमान उभ्यानें निमाज पढण्याला सुरवात करतात, तशी आमची संध्याही तूर्त उभीच राहिली पाहिजे, ख्रिस्त्यांची प्रार्थना, मुसलमानांचा निमाज आणि हिंदुब्राह्मणांची संध्या सारख्या रेषेंत आणण्याचा एकजुटीनें प्रयत्न व्हायला पाहिजे असें लीले, तुला नाहीं कां वाटत ?

**लीला**—मला काय वाटतें हें मी आतांच कशाला सांगूं ? पण तुमचे विचार मात्र थोर खरे, विचारांसारखा उच्चार अन् त्याला योग्य असा आचार पाहिजे.

**बाळ०**—मीही त्याच पंथाला लागलों आहे.

**लीला**—पंथाला नका लागूं इतक्यांत ? पुष्कळ दिवस जगा ? बाळकोबा—

**बाळ०**—बाळकोबा ! शेवटला 'बा' ! ह्मणजे 'बाप' या पदविला मी अद्याप पात्र झालों नाहीं. नुसतें बाळको ह्मणण्यापेक्षां तूं मला ' बळवंतराव ' ह्मणत जा !

**लीला**—ह्मणत जाणारच आहे मी ! तुह्मांला माझा कंटाळा आला वाटतें !

**बाळ०**—कंटाळा ! लीले, तुझा कोणालाही कंटाळा येणार नाहीं. मला तर कधींच येत नाहीं.

**लीला**—पण तुह्मी मला ' जा ' म्हणालां तें ! म्हणून सवरून पुन्हां नाहीं म्हणतां ?

**बाळ०**—म्हणत जा म्हणजे म्हणण्याची वहिवाट ठेव असा अर्थ ! लोकमान्य टिळकांनां त्यांच्या सलगीतली मंडळी ' बळवंतराव ' म्हणत असत. तेव्हां म्हटलें

अनायासें 'गांधींचा पोषाख' टिळकांचें आडनांव नाहीं तर निदान नांव-असा योग्य जमवावा. तूं भलताच अर्थ घेतलास.

लीला—( स्व. ) आतां याला असाच बनवून ठेवला पाहिजे. याचा उपयोग उद्यां खटल्यांत होईल ( उघड ) भलताच कसा ! 'जा' याचा अर्थ उभीरहा. असा कधीं तरी झाला आहे का ! मी जातेच कशी

बाळ०—नको नको, लीले, अशी रागावून जाऊं नकोस हा पहा, माझ्या संध्येचा गायित्रीजप मी माझ्या विधर्मीय हिंदबांधवांच्या पद्धतीप्रमाणें-गुडघे टेकून-करितों आहे. मुसलमानांप्रमाणें मी यावेळी स्वतःचे कानही धरतों. ते आपल्या परमेश्वरापुढें गुडघे टेकून, कान धरून त्याला आळवीत असतील, पण माझा परमेश्वर तूंच-मी तुझीच प्रार्थना करीत आहे. [ तसें करतो. ]

लीला—( स्वः ) अहाहा ! काय पण ध्यान दिसतें आहे ! आतां सावळारामाचें नांव याच्याकडून काढून घेतलें पाहिजे. ( उ. ) बरें, मी तुमचा परमेश्वर तर, विचारतें त्याची खरी हकीकत सांगा. या खटल्यांत तुम्ही फिर्यादी कसें झालां ! कां तुम्ही खरोखरच दारूबाज आहां !

बाळ०—नाहीं ! मी सत्य सांगतों हा बळवंतराव दारूबाज नाहीं ! मी फिर्यादी झालों तो-त्याला निराळेंच कारण आहे.

लीला—तें कारण कोणतें-खरें सांगा-परमेश्वरापाशीं लपवून चालत नाहीं-माहीत आहेना तुह्मांला !

बाळ०—हे लिला-प्रिय परमेश्वरा, या तुझ्या भक्ताला. या दासानुदासाला-सर्व कांहीं माहीत आहे. पण लीले, तें कारण राहींना तसेंच ! तुला काय करायचय् त्याच्याशीं ?

लीला—हं ! आपला दर्जा सोडूं नका ! लीला दैवती आहे ! तुम्ही माझे भक्त आहां-त्याच अधिकारानें मी तुह्मांला विचारते-या खटल्यांत तुमचा गुरू कोण !

बाळ—परमेश्वरा तूं सर्वज्ञ आहेस-'सर्वज्ञा परमेश्वरा सकरुणा बापा'-अरे बापरे ! लीले हें चुकलें ! फुंकशो !

लीला—मी तुमचा बापही होत नाहीं-आणि आई ही होत नाहीं मग आलें ना ! पण गुरूचें नांव बोला.

दिलेंस ! तूं खास शतायुषी होणार माझा तुला आशीर्वाद आहे. (एकीकडे) पण वरानें आपल्या भावी वधूला आशीर्वादच द्यायचा असतो कां ?

**लीला**—पण या अशा वेषांत इकडे—

**बाळ०**—(स्व.) इकडे ! बायका नवऱ्याबद्दल 'इकडे' 'तिकडे' च करतात ! आहे, यशाचा रंग आहे ! पोषाखानें बरेंच काम केलेसें दिसतें ! (उघड) वेषावर तुझी बरीच नजर दिसते ! लीले, हा वेष-महात्म्यांच्या प्रसादाचा हा पवित्र पोषाख—'अपवित्रः पवित्रो वा !'

**लीला**—इथें उभ्या उभ्याच संध्येला सुरवात झाली कां ?

**बाळ०**—(स्व:) हो, हा संध्येच्या आरंभाला म्हणतात नाहीं कां ? चकलें तरी सावरून घेतलें पाहिजे ! (उघड) लीले, तूर्त हा हिंदुमुसलमानांच्या एकीचा काळ आहे, म्हणून मुसलमान उभ्यानें निमाज पढण्याला सुरवात करतात, तशी आमची संध्याही तूर्त उभीच राहिली पाहिजे, खिस्त्यांची प्रार्थना, मुसलमानांचा निमाज आणि हिंदुब्राह्मणांची संध्या सारख्या रेषेंत आणण्याचा एकजुटीनें प्रयत्न व्हायला पाहिजे असें लीले, तुला नाहीं कां वाटत ?

**लीला**—मला काय वाटतें हें मी आतांच कशाला सांगूं ? पण तुमचे विचार मात्र थोर खरे, विचारांसारखा उच्चार अन् त्याला योग्य असा आचार पाहिजे.

**बाळ०**—मीही त्याच पंथाला लागलों आहे.

**लीला**—पंथाला नका लागूं इतक्यांत ? पुष्कळ दिवस जगा ? बाळकोबा—

**बाळ०**—बाळकोबा ! शेवटला 'बा' ! ह्मणजे 'बाप' या पदाविला मी अद्याप पात्र झालों नाहीं. नुसतें बाळको ह्मणण्यापेक्षां तूं मला 'बळवंतराव' ह्मणत जा !

**लीला**—ह्मणत जाणारच आहे मी ! तुह्मांला माझा कंटाळा आला वाटतें !

**बाळ०**—कंटाळा ! लीले, तुझा कोणालाही कंटाळा येणार नाहीं. मला तर कधींच येत नाहीं.

**लीला**—पण तुह्मी मला 'जा' म्हणालां तें ! म्हणून सवरून पुन्हां नाहीं म्हणतां ?

**बाळ०**—म्हणत जा म्हणजे म्हणण्याची वहिवाट ठेव असा अर्थ ! लोकमान्य टिळकांना त्यांच्या सलगीतली मंडळी 'बळवंतराव' म्हणत असत. तेव्हां म्हटलें

हजरच आहे. बाळकोबा तुम्हीं उद्यां जरी सरळ गोष्ट कबूल केली नाहीं तरी ती तुमच्याकडून काढून घेण्याचें काम आतां काकांचें. तुम्ही आतां खुशाल वाटेल तिकडे जा!

**बाळ०**—( स्व. ) सगळाच बेत फसला! प्रकरण आंगांवर येणार कीं काय? [ जातो. ]

***लीला***—काका, या खुळचटाशीं बोलण्यांत माझ्याकडून चूक—

**काका**—बाळ, तुझें धोरण माझ्या पुरतें लक्षांत आलें. तूं फारच उत्तम कामगिरी केलीस! अन् याबद्दल उद्यां सुटून आल्यावर वसंतसुद्धां तुझी पाठ थोपटील—

***लीला***—पण तुम्ही मला आधीं पोटाशीं धरा! काका, हें काय झालें हो! मला असें कां होऊं लागलें! काका-काका— [ मूर्छा-काका सावरून धरतात. ]

**काका**—मनोवृत्तींवर बेसुमार ताण बसला! पोरीला शेवटीं असह्य झालें. वसंतावरचें प्रेम अशा अचानक बदललेल्या परिस्थितिमुळें दडपून गेलें—तरी जीवाची तळमळ रहाणार कशी? बाळे या कोवळया वयांत तुझे हे असे हाल! बाहेरले सोंग निराळे, आंतलें स्वरूप अगदीं विरुद्ध अशा दुहेरी कातरींत माझा बच्चा सांपडला! लीले, जातील हेही दिवस जातील, आणि तुला अंतर्बाह्य आनंदांत रंगलेली मी लवकरच पाहीन! आपल्या आईला हल्लीं किती भिऊन असते ही पोर! उगीचच भिते. आइचें अंतःकरण-जरा गैर समजुतीनें निराळया दिशेला वळलें-तरी त्याचें मार्दव कधींही कमी होत नाहीं, हें बाळे, तूं स्वतः आई झाल्याशिवाय तुला कसें कळणार! चल आंत-बाहेरला वारा झोंबूं लागला—

[ तिला घेऊन जातो. ]

---

## अंक—तिसरा. प्रवेश—तिसरा.

[ वेणूचें बिऱ्हाड—वेणू चरक्यावर सूत काढीत बसली आहे असा प्र. ]

**वेणू**—स्वराज्यासाठीं तळमळणारा लोकमान्यांचा आत्मा या आर्यावर्तांत च चरक्यासारखाच फिरत असेल काय? प्रत्येक हिंदपुत्राच्या हातीं, प्रत्येक

**बाळ०**—गुरुचें नांव बोलूं ? बोलतोंच तर ! देवाची आज्ञा झाली आतां भिऊन काय करायचें ! माझ्या गुरूचें नांव सावळाराम ! ( पाहून ) ऐकत नाहींना दुसरें कुणी ?

**लीला**—उद्यां कोर्टांत त्या जबानींत तुह्मी हें नांव सांगितलें पाहिजे.

**बाळ०**—कोर्टांत ! कोर्टांत सांगून काय करायचें ! तुला कळलें तेवढें पुरें नाहीं कां झालें ? [ काका प्र. क.]

**लीला**—नाहीं ! तुम्हीं कोर्टांतल्या जबानींत सावळारामाच्या केवळ चिथावणीनें हा बनावट खटला केला असें कबूल केलें पाहिजे.

**बाळ०**—वा ! त्याचें नांव भर कोर्टांत सांगितलें म्हणजे तो रागावेल कीं ! छे तें नाहीं जुळायचें !

**लीला**—जुळायचें नाहीं ! जुळलें पाहिचे ! बोला तुम्ही कोर्टांत खरी हकीकत सांगणार कीं नाहीं !

**बाळ०**—लीले, असा काय बरें भलत्याच गोष्टींत हट्ट धरून बसतेस ! परमेश्वर भक्ताजवळ असा हट्ट धरून बसत नाहीं.

**लीला**—हट्ट ! परमेश्वराचा हट्ट पुरविण्यासाठीं भक्तानीं आपलें प्राणार्पण केलेलें आहे. पण मी तितकी हट्टी नाहीं ! बोला कबूल करणार कीं नाहीं ?

**बाळ०**-करीन-तुझ्यासाठीं खरें बोलेन, पण सावळारामाची मला भीति वाटते.

**लीला**—तो तुमच्या जबानीच्या वेळेला तर कोर्टांत नसतो ना ? त्या वेळेला कांहीं भीति धरायला नको.

**बाळ०**—अन् कबूल केल्यावर पुढें.

**लीला**—पुढलें पुढें पाहतां येईल.

**बाळ०**—छे, अजून नाहीं छाती होत. लीले, राहींना कां हा विषय ! आपण आपल्या दुसऱ्या सुखासमाधानांच्या गोष्टी बोलूं.

**लीला**—तुम्हांला छाती केलीच पाहिजे. तुमच्या कबुली जबाबाशिवाय लीलेला सुख नाहीं, समाधान नाहीं-गोष्टी सुचायच्या नाहींत !

**बाळ०**—सत्य मलाही आवडतें. पण—

**लीला**—पुन्हां पण—तुम्ही कबूल करतां कीं बोलावूं काकांना !

**काका**—( पुढें होऊन ) काकाला बोलावण्याचें कारण नाहीं ! काका

पाहिजे, म्हणजे मग सरकार आपण होऊन स्वराज्य देईल आम्हांला. काकू, स्वराज्याचें राहो एक बापडें. देणारे देतील तेव्हां घेणारेही हात पसरून घेतील. पण या उद्योगानें बायकांचा मात्र तूर्त मोठा फायदा झाला आहे नाहीं कां?

**उमा**—या उद्योगांत बायकांचा तो कशाचा कपाळाचा फायदा! घटकाभर कुठें बोलाबसायला वेळ सांपडायचा नाहीं—

**लीला**—हाच फायदा! घरचें खाऊन लष्करच्या भाकरी भाजायच्या, लोकांच्या घरच्या नसत्या उठाठेवी करायच्या, अमकीचा पदरच लहान, तमकीचा बुचडाच वाईट, अमकीचे डोळेच घारे, तमकीचें नाकच नकटें, कुणाचे कांहीं बसल्या बसल्या कुरापती काढायची जी आपणा बायकांना सारखी सवय लागली आहे ती या चरक्याच्या गिरक्यासरशीं तेव्हांच निघून जाईल.

**उमा**—ताई, झालें कां सुरूं तुझें लेक्चर? आतां कांहीं इथें थांबण्याची सोय नाहीं.

**वेणू**—काकू, बामणांच्या रिणकरणी म्हणून आपल्या इतर जातीच्या भगिनी आपल्याला नेहमीं हिंगवीत असतात. त्याच आपण जर उद्योग करूं लागलो तर—

**उमा**—पुरें बरे कां तुझें हें व्याख्यान! लीले, तूं बैस हवी तर, मी जाते बाई! [जाते.]

**वेणू**—काकू-खरेंच गेल्या! उगीचच रागावल्या त्या! तरी मी त्याना फारशी बोलत नाहीं.—

**लीला**—पण तुझें थोडेसेंच बोलणें तिला वर्मी लागतें ना? जाउंदे ताई, मला आतां आईच्या रागाची चांगली सवय झाली आहे. ती जितकी जास्त रागावते, तितकी मी अधिकच हसूं लागते. (पाहून) आई गेली तरी ही पहा दुसरी बाई आली. [सगुणा प्र. क.]

**वेणू**—थांब वहिनी, तूं आज बैस इथेंच? हेंग काय तुझें? रोज इथें येऊन सगळें घरांतलें काम करायचें—म्हणजे मी निराळी राहून तुला दुप्पट त्रास झाला मात्र कारण झालें म्हणायचें. तें कांहीं नाहीं मी तुला आजपासून इथलें कांहीं एक काम करूं द्यायची नाहीं!

**सगुणा**—वन्सें, काम करण्यांत त्रास तो कसला व्हायचा आहे? इथें तुम्ही

भगिनी जवळ चरका असावा म्हणून आग्रहानें सांगणारे माहात्माजी गोखल्यांना गुरु म्हणतात, लोकमान्यांचा राजकारणातला मार्ग पाहतात, दोन्ही पंथांतून एक काज काढूं पहाणारा हा महात्मा-या महात्माला आमची शतशः वंदनें असोत. गोखल्यांची दृष्टि राजाला संमुख असे; ते राज्यमान्य पुरुष होऊन गेले-लोकमान्यांनी लोकाकडे दृष्टि ठेऊन जनता जागृत केली! हा महात्मा—अंतर्मुख वृत्ति करून राष्ट्राची चालना करूं पहाणारा हा महात्मा-याला स्वानुभव स्वतःच्या अंतःकरणाची शुद्ध प्रतीतिच श्रेष्ठ वाटते. तो राजसत्तेला भीत नाहीं, जनतेला जुमानीत नाहीं. हा महात्मा आत्मविश्वासाच्या बळावर दोघांना दोन मुठींन धरून दोहोंचा एकजीव करण्याचा यत्न करीत आहे! परमेश्वरा या महात्म्याच्या प्रयत्नाला यश देऊन तूं राष्ट्रावर सुखाचा पाऊस पाडशील कारे? देशांतील दुही मोडून एकीचा उदय झाला म्हणजे राजसत्तेला प्रजेच्या कल्याणाविषयीं बेफिकीरी दाखवीताच यायची नाहीं! पण हें व्हायचें कसें! आमचे पुढारी आम्हांला नकोसे वाटायला लागले, वाइटाकडे दृष्टि इतकी जाऊं लागली कीं त्या वाइटाच्या डोंगराखालीं चांगले दडपून गेलें. प्रत्येक स्वतंत्र झाला, कोणाचें कोणी ऐकायचें नाहीं एकमेकांला शिव्या देऊन आपलें करणें सजावयचें—केवढी ही अनवस्था! पर लोकांत प्रवेश करूनही ज्यांना ही राष्ट्राची स्थिती पहातां येत नसेल त्यांना त्यांच्या पुण्याईचा आनंद तरी काय मिळायचा आहे? प्रत्येकांतलें चांगले घेण्याची दृष्टि ठेवतां आली तर? तर काय? मग हा भांडणाचा काळच संपून जाईल! भांडण—जिथें तिथें भांडण चाललें आहे. मवाळांना जहाल नांवें ठेवतात, जहालांना गांधीभक्त चिडवितात आणि सामान्य लोक—लोकांचें काय? ते जिकडे न्याल तिकडे जाणार! जनतेला नेता मिळेल तसे ती काम वजावणार. जनता भोळी! (उमा लीला प्र. क.) या उमाकाकू लीले, तूही आलीस कां!

**उमा**—ही मला घरीं बसूंच देईना मुळीं. ताईकडे चल चल, म्हणून सारखी कट कट लावली होतीन् ते सूत दाखवायचें होतें ना गुरुजीला? पहा शिष्यिणीची कमाई पहा एकदां! अन् सांगा आतां भरेल कीं नाहीं आपल्या नवऱ्याचें पोट? काय तरी बाई एकेक खूळ निघायला लागलें आहे आतांशीं.

**वेणु**—लीले. तुझें सूत बरेंच चांगलें निघालें आहे बरें कां? काकू, या खुळानें सगळें राष्ट्र खुळें झालें पाहिजे, घरोघर चरक्याची घरघर सुरू झाली

हा कशाचा परिणाम! कालाय तस्मै नमः। अनंतरूपी विशाल काला, तुझ्या उदरांत आणखी काय काय चमत्कार आहेत? मनुष्याच्या नित्याच्या व्यवहारांत झटक्यासरशी घटकेला उलटी पालटी उडी घ्यायला लावणारा तूं परमेश्वर, तुझ्या मनांतली योजना-भविष्यकाळच्या सृष्टीची रूपरेखा कोणाला कळणार आहे? दीन दुबळे क्षणांत प्रबल झाले, रंकांचें मानसिक वैभव पहातां पहातां रावांच्याही डोक्यावर चढूं लागले-भगवंता तुझा महिमा अपार आहे! तुझ्या दुःखांतच सुखाचें मुळ, आणि सुखांतच दुःखाचें बळ असतें. देशाच्या उलाढाली तूंच घडविणार, या सर्व विश्वाची सृष्टि स्थितिलय करणारा तूं, देवा तुला आम्हां पामरांनीं काय नावानें-काय निंदावें? आज ऑफिसांत कामाकडे लक्ष लागेना-म्हणून शॉर्ट लिव्ह पुटअप् करून आलों-म्हटलें ताईचा समाचार घ्यावा. ताई, बाळ तूं इथें-या भिकार जागेंत कशी रहात असशील! वसंत तिकडे अडकलेला मला इकडे फिरण्याची सुद्धां चोरी-काय हाल हे! केव्हां हे दिवस संपतील तव्हां खरें! अरे पण-( खिसा चापसून )पाकीट-खिशांतच ठेवलें होतें कीं! हं! ऑफिसचा कोट बदलला-त्यांतच राहून गेलें-काय भ्रमिष्ट तरी मी! आज पेढे म्हटलं पोरीला खाऊला कांहीं तरी द्यावें-तों पाकीटच घरीं विसरून आलों-छे, त्याच पावलीं जाऊन आणलें पाहिजे. [ जातो, सावळाराम प्र. क. ]

सावळा—दादा आज इकडे कोणीकडे? साहेबांची भीति मोडत चालली वाटतें! बाजूला म्हणून मुद्दाम हें घर पाहून दिलें-पण आतां इकडेही मंडळीच्या फेऱ्या व्हायला लागल्या! बापू, आतां उगीच वेळ लावतां उपयोगी नाहीं. बस्तान डळमळलें नाहीं इतक्यांत डाव टाकला पाहिजे. आतांच पाहूं या साधतो आहे का! वसंताला आजच्या निकालांत कैद झाली तर ठीक-निदान दंडाबद्दल म्हणून तरी महिनाभर तो तिकडेच धडपडत राहूं द्या. आमच्या आक्कासाहेबांचीही दृष्टि इकडे आतांशी वळूं लागली आहे. छे, लवकर गडबड केलीच पाहिजे. ( विचार ) असा-अस्सा पेच घालायचा! पाहूं या तर खरें कशी वळत नाहीं ती? ( पाहून ) आलीच इकडे! ( स्वगत, मोठ्यानें ) बाकी आपल्याला काय करायचंय् म्हणा. ज्याची ती मुखत्यारच आहे-पण अशा स्थितींत हें असें-छे बुवा. पण माणसाची बुद्धि केव्हां पालटेल याचा नेम नाहीं.

वेणू—( प्र. क. ) काय-काय म्हणतां तें आपल्याशींच ! मुखत्यारी कसली बुद्धि कुणाची पालटली ?

सावळा—( दचकल्यासारखें दाखवून ) ऐकलें कीं काय तुम्ही माझें बोलणें : वाइट झालें. पण तिकडे लक्ष्यच देऊं नका तुम्ही. आज कितीसें सूत निघालें-स्टोअरकडे न्यायला आलों आहे मी-( स्व. ) बाकी मोठेंच आश्चर्यम्हणायचें-निदान हिच्या बाबतींत तरी—

वेणू—हें पहा-पुन्हां तुम्ही बोलूं लागलां-आश्चर्य कसलें ? हिच्या म्हणजे कुणाच्या बाबतींत ? सगळें सांगून टाका पाहूं—

सावळा—बरें, सुताचें नाहीं सांगितलें कायतें ?

वेणू—सूत मला फारसें काढायला झालेंच नाहीं ! दुसरीं कांहीं कामें होतीं.

सावळा—दुसरीं कामें-मला वाटलेंच, तरी म्हटलें हें खोटें कसें होइल ? ( रागानें ) अरे लेका हरामखोरा—

वेणू—हें काय ! रागावतां कुणावर ! कोण आहे तिकडे ?

सावळा—या वेळीं कोण असणार ! पण एकदां गांठ पडायला पाहिजे होती. म्हणजे असा बेदम पिटला असता कीं हाडें चूर करून पिशवींतच भरावींत. पण वेणूताई आपल्याला बोलायचें कांहीं कारण नाहीं. बाकी हें एकंदरींत वाइटच ! वायकांचें चुकतें हें असेंच-करायचेंच कांहींबाही तर एखादा समजूतदार माणूस पाहावा-या कानाची बातमी त्या कानाला नाहीं ! पण हा खुळचट लेकांचा-हलकुंडाच्या नुसत्या दर्शनानें स्वतःला पिवळा होऊन गांवभर मिरवींत जायची ही मूर्ति आलें-आलें माझ्या लक्ष्यांत-तुमचा त्याच्या बद्दलचा अंदाज चुकला-असेंचना ? अहो पण-मी होतोंना-होतों कीं ? हा इथें सध्यां तुमच्याजवळ उभा आहे. मला अगदींच बेअकली समजतां तुम्हीं ? ( पुन्हां राग ) गाढव ! शुद्ध पशु ! सगळ्या गांवभर बोंब मारीत हिंडतो आहे-मोठा दिग्विजयच लावला कीं नाहीं लेकानें-होय बाबा, लावलास खरा ! आपलीच बैठक आपल्या मांडींत नाहीं, अन् स्वारी घसरली म्हणून जग हंसलें तर जगाला बोल लावण्यांत काय अर्थ आहे ?

वेणू—तुम्ही हें अर्धवट काय बोलतां ? मला कांहींच कळत नाहीं. मी अगदीं गोंधळून गेलें आहे.

सावळा—बरोबरच आहे! मी नुसतें ऐकून जर वेडा बनलों तर हातून कृति झाल्यानंतर तिची वाच्यता झाली म्हणजे असा गोंधळ उडणें साहजिक आहे. (राग) पण हें त्या बेंअकली प्राण्याला कळतें आहे कुठें!

वेणू—काय तुम्ही ऐकलें असेल तें स्पष्ट सांगून टाका एकदा. माझ्याजीवाचे उगीच असे हाल करूं नका. कुणाच्या हातून कसली कृति झाली म्हणतां!

सावळा—नाहीं, कृति झाली असेल असें अजूनही माझ्या मनाला पटत नाहीं. त्या लेकाच्याची सुरत ती काय, त्याला काडीइतकी तरी अक्कल—पण माणसाचा काय नेम सांगावा? भुकेलें कोल्हें—

वेणू—अजून मला कांहीं उलगडा होत नाहीं—

सावळा—वेणू, आतां वेड पांघरलें म्हणून तो वेडा थोडाच आवरणार आहे! तरी म्हटले हा बाळक्या आतांशा वेळीं अवेळीं या घराभोंवतीं घिरट्या कां घालीत असतो! अरे बाळक्या! माझी सोबत करून चांगलाच लग्गा साधलास कीं!

वेणू—त्या बाळकोबाबद्दल हें बोलणें चाललें आहे होय! काय झालें त्याच?

सावळा—त्याचें! त्याचें काय व्हायचें आहे! कांहीं झालें तर तें आपलेंच होणार बरें, बाईसाहेब!

वेणू—त्याच्यामुळें माझें काय होणार! त्याचा माझा संबंध काय?

सावळा—संबंध काय तो त्याच्या तोंडून सगळ्या जगाला कळला आहे कीं! आतां संबंध लपून थोडाच आहे!

वेणू—शिव शिव! काय झालें हें! जो अपवाद येऊं नये म्हणून जपायचें तोंच प्रसंग असा आला कां?

सावळा—वेणू, जपून वागली असतीस तर हा प्रसंग आलाच नसता! आधीं निवड चुकली—

वेणू—पुरे करा तुमचें हें मायावी बोलणें! इतके दिवस वहिनीच्या संगतींत राहून वेणूची हीच कां पारख केली? अनाथ स्त्रीवर जनतेच्या अपवादाचे दुष्ट हात पडत असतां तिच्या भावांनीं ते हात झिडकारून परत टाकायचे कीं आपणही त्यांत भर घालायची!

सावळा—कुणाचा भाऊ आणि कुणाची बहीण! वेणू, एका आईच्या पोटीं पाठोपाठ जन्म घेतलेल्या स्त्रीपुरुषांत सुद्धां रहायला कठीण वाटणारा हा

भाऊ बहिणीचा संबंध—या जगांत खरा संबंध एकच आहे—आणि तो स्त्रीपु-षाचा ! तूं भावाची दृष्टि बाजूला ठेव आणि एक पुरुष म्हणून माझ्याकडे पहा !

वेणू—पशू-शुद्ध पशूची भाषा दिसते ही ! तुमच्याशीं माणसानें काय बोलायचें !

सावळा—तूंही पशू होऊनच माझ्याशीं पशूची भाषा बोल ! तुझी इच्छा नसेल तर मी तुला तशी भाषा बोलायला शिकवीन. बाळक्यासारख्या कुत-ऱ्याला जवळ करतांना—

वेणू—खबरदार ! आतां या पुढें एक अक्षर बोलाल तर—

सावळा—ठीक आहे—वाचा बंद !-आतां कृतीला सुरवात—[ हात धर-तो, ती झिडकारते. लीला पाहून जाते. ]

वेणू—याक्षणीं या घराबाहेर चालता हो ! पापिष्टा, चांडाळा, वाटेल तीं खोटीं कुंभाडें उभी करून स्वतःच्या पापाचा मार्ग मोकळा करून घेणाऱ्या पाजी माणसांपैकींच तूंही एक आहेस—हें मला माहीत नव्हतें. माझ्या वहिनींचा—तूं भाऊ—तुलाही मी आपला भाऊ समजत होतें—चल, एक क्षणभरसुद्धां उभा राहूं नकोस—हो चालता ! जगांतल्या स्त्रीपुरुषांत, मायलेकरांचे, भाऊ-बहिणीचें असें पवित्र प्रेमाचे संबंध असतात या गोष्टीची तुझ्या मनाला जाणीव तरी आहे कां ? चल, जा म्हणते ना ?

सावळा—त्या बाळक्याच्या नांवानें जगांत डांगोरा पिटलेला ऐकला म्हणजे मग तरी डोळे उघडतील कां ?

वेणू—तूं जागंत वाटेल तसा गोंधळ घाल जा ? हातून पापाचरण झालें नसतांना नुसत्या खोटया दुर्लौकिकाच्या भीतीनें पापांत पडण्याइतकी वेणू भोळसर नाहीं ! तूं तोंडाच्या जोडिला हाताची जास्त मदत घे. आणि माझ्या नांवानें हवे तितके खडे फोड ! उद्यां असल्या एखाद्या पराक्रमानें तुरुंगांत जाऊन खडी फोडण्याची पाळी येणार, त्याचा हा अभ्यास सावकास चालीव. मला कशाची भीति दाखवतोस ? कपाळचें कुंकू पुसून फटिंगा सारखी जगांत राहणारी मी स्वतंत्र स्त्री आहे ! मी मानीन तें पुण्य. लोटून देईन तें पाप ! तूं माझें आतां काय नुकसान करणार ?

सावळा—मी काय करणार हें पाहाण्याच्या भरीस आपण पडूं नये. माझी इच्छा कशीही असली तरी ती मी पुरी करून घेण्याच्या इराधानेंच इथें येत

असतों. बाळक्याचें नांव कशाला? माझ्या स्वतःसंबंधीं उद्यां लोकांत तुझ्या नावानें कांहीं कंड्या पिकविल्या तर त्या खोट्या कोण म्हणणार?

**सगुणा**—( लीलेसह प्र. क. ) मी—मी म्हणणार त्या सगळ्या कंड्या खोट्या आहेत म्हणून! मी तुझी वडील बहीण तूं बोलशील त्याच्यापेक्षां दुप्पट जोरानें ओरडून लोकांना सांगेन कीं सावळ्याचें सगळें सांगणें फोल-खोटें-आहे म्हणून! सावळारामबापू, वहिणीच्या इथें एतोबा सारखे यथेच्छ आदळून हे बाहेर चांगले पराक्रम चालले आहेत! मेल्या, कस्पटा, तुला अक्कल आहे! मांगापेक्षांही नीचपणाचें वर्तन करायाला तयार झालास! तुझें काळीज तरी कशाचें बनलें! घरदार, गोत, आप्त याचा कांहीं विचार आहे का? शुद्ध पशू-सारखें वागायाला लागलास, म्हणावें तरी काय तुला! थांब, चाललास कुठें! या तुझ्या आईपुढें नाक घासून क्षमा माग अन् मग जगांत वाटेल तिकडे भीक मागत जा! खुशाल तोंड काळें कर!

**लीला**—सुधारक म्हणून मिरविणारे हेंच शिष्ट का! वा, महाराज, सुधार-कांच्या नावाला चांगलीच काळोखी फासलीत आपण!

**सावळा**—( स्वगत ) डाव अगदींच उलटला! ही आकाबाई इतकी जवळ हाकेला उभी आहे हें माहीत नव्हतें! ( पाहून ) पुराघात झाला! सगळीच मंडळी आली इकडे! [ त्रिंबकराव प्र. क. ]

**त्रिंबक**—हें काय! हा सावळाराम इकडे कुणीकडे!

**सगुणा**—तें मी सांगतें सगळें, आपण आधीं या हलकटाला पोलिसच्या ताब्यांत द्यायचा होता. [ बाळकोबा पोलिसच्या ताब्यांत प्र. क. ]

**बाळ०**—दादानां कशाला तेवढी तरी तसदी! हा पोलिस इथें हजर आहे. माझ्या एकादंडाची काढणी सोडून ती बापूच्या दंडाला बांधील, म्हणजे माझा एकदंड मोकळा होईल, आणि बापूचा थोडा अटकाव होईल. शिपाईबुवा, हेच आमचे गुरुजी? बापू काय चमत्कारिक योगायोग तरी! वसंताला याच शिपायाच्या ताब्यांत मी दिला होता. तोच आज आपल्याही वाटणीला आला. शिपाईबुवा ओळख आहेना तेव्हाची? दुसरे सांगूं का बापू! तुम्ही ही गांधी टोपी बरोबर घेऊन चला! कारण गांधी टोपी यशस्वी ठरली आहे. वसंताच्या

सारखी आपलीही सुटका होईल! म्हणून म्हणतो गांधीचा राहो पण तुर्त आपण या गांधी–टोपीचाच जयजयकार करूं. वसंतासारखी आपलीही सुटका होईल.

[ सावळारामास पकडतात. काका वसंत प्र. क. ]

**काका**—सुटकेची आशा तुमच्या बाबतींत मुळीच नाहीं बुवा. अलीकडले पिकेटिंगचे बहुतेक खटले असें बनावट ठरल्याचें जज्जसाहेबानें पाहिल्यामुळें उपद्यापी लोकाना चांगला धाक बसावा म्हणून मुद्दाम त्यानीं हें वारंट सोटलें आहे या बाळकोबा, तुम्ही मात्र विनाकारण सांपडलां.

**बाळ०**—विनाकारण कसें होईल ! लग्न होऊन चतुर्भुज होणार होतों, तों हा असा चतुर्भुज झालों. आतां बापू तुमचे चार अन् माझे चार आठ हात झाले, अष्टभुजादेवीचें सोंग चागलें दिसेल नाहीं! आता डोकीं दोन असली तरी—

**शिपाई**—त्यातलें तुझें नाहीतर तुझ्यागुरुचें एक डोकें उतरून टाकता येईल! चल हो पुढें ! बडबड किती लावली आहेस !

**सावळा**—( स्वगत ) तूर्त तरी बडबड झाली खरी? ठीक आहे! पुन्हा केंव्हा तरी संधि येईल! [ जातात. ]

**त्रिंबक**—ये, ये, वसंत ताई मला दोघेंही कडकडून भेटा. तुम्हा दोघाच्या पायीं माझा जीव उडून गेला होता ! पण देवानें हा आनंदाचा प्रसंग आणला ! आता येताना आमचे सुपरिंटेंडेंट भेटले होते, त्यानीं मला सगळी हकीकत सांगितली. सावळारामानेंच सगळ्या घरच्या चहाड्या साहेबाजवळ सांगितल्या—

**सगुणा**—सावळ्या वा! मोठा पाताळ यंत्री—घातकी ग बाई ! बरें झाले, आता बसूं दे जन्मभर कैदेत !

**त्रिंबक**—साहेबानें सरकारात रिपोर्ट केला, तेंव्हा गव्हरमेंटचेंच उत्तर आलें कीं, या बाततींत कुणीही विशेष सीरीयस् स्टेप्स घेऊं नयेत. तेंव्हा खुद्द साहेबानें तुमच्याबद्दल सॉरी म्हणून क्षमा मागितली. म्हणे चला आता मला माझ्या भावंडाला राजरोस घरीं घेऊन राहयला कोणाची भीति नाहीं.

**त्रिंबक**—........ कोणाची भीति नाहीं

**लीला**—शेवटीं सुटका करून घ्यायला काकांची–वकीलीची मदत घ्यावी लागलीचना ? महात्माजीचे मोठे अनुयय्यी--कट्टे--भक्त--पट्टीचे शिष्य-त्यानींच शेवटीं डिफेन्ससाठीं वकीलाची पट्टी कपाळाला बांधून घ्यावी हे मला सुद्धां—



वसंतः—मला स्वराज्याचा हुंडा मिळाला पाहिजे ! [ अंक ३ रा, प्रवेश ३ रा.

**काका**—थांब, ताई इतक्यांतच तर्कांवर इमारत रचूं नकोस. नुसत्या तर्कांची अनुमानें प्रत्यक्षाच्या अनुभवानें फुकट ठरतात हें लक्षांत आहेना? आमच्या जिवाची तळमळ राहीना म्हणून मोठया पोक्तपणाचा आव घालून पुन्हां वकीलीची पगडी चढवून गेलों, पण—

**वेणू**—पण ती पगडी तरुण पिढीच्या उत्साहमूर्तींपुढें लवतांना त्या पायींच वाहिली गेली, असेंचना? वसंत, तूं नाहींना वकीलाची मदत घेतलीस?

**वसंत**—ताई, तुला सुद्धां माझ्याबद्दल असा अविश्वास असावा कां? लीलेला माझ्याबद्दल शंका आली ती एका दृष्टीनें सयुक्तिक आहे, कारण कांहीं केलें तरी ती काकांचीच लीला आहे. पण मी तुझा भाऊ–सत्याग्रही वेणूचा, एकाच रक्तामासाचा भाऊ–ताई, सांग तुला माझ्याबद्दल शंका कशी आली? माझी सुटका खुद्द फिर्यादीनें-बाळकोबानें म्हणण्यापेक्षां बाळकोबाच्या अकलेनेंच केली. जज्जानें केलेल्या एकाही प्रश्नाचें सरळ उत्तर देतां येईना? बोलतां बोलतां गोंधळून त्यानेंच सावळारामाचें गुरुत्व कोर्टांत कबूल केलें. त्या मूर्खाच्या या शहाणपणांमुळें सगळा खटला आपोआप फसला.

**सगुणा**—फसला तर बरें झालें. देव पावला. भाउजी, तुम्ही दोघेजण घरांतून गेल्यापासून इकडे क्षणभर तरी सुखाचा गेला आहे का? रात्रंदिवस पोरं-वसंता, ताई,-असा जप चालला होता.

**वसंता**—मग दादा, आता एकदां या गोष्टीचा चहा—

**त्रिंबक**—अरे कसला चहा घेऊन बसला आहेस?

**वसंत**—नाहीं. मी घेऊन नाहीं बसलों! वहिनींना बनवायला सांगा म्हणून सुचविलें.

**त्रिंबक**—पोरा, तुला आतां सुचते आहे चेष्टा, पण इतके दिवस आमच्या तोंडचें पाणी पळालें होतें. राजा, तुझ्या काळजींत या म्हाताऱ्याला चहाची आठवण सुद्धां झाली नाहीं. बरें झालें. एकदां सुटला तो आतां कायमचाच? ताई,-विचार कसला करतेस?-अग, हें असेंच चालायचें-जगांत सावळ्यासारखे पाजी लोक पुष्कळ आहेत–आपण त्याचा संबंधच टाळला म्हणजे झालें.

**उमा**—( गडबडीनें प्र. क. ) लीले लीले, किती तरी वेळ लावलास हा? घरची काहीं शुद्ध आहे का नाहीं! ( पाहून ) अगबाई सगळीच मंडळी आहेत कीं इथे, वसंतराव तुमच्या सुटकेमुळें मला फार आनंद झाला हो.

सगुणा—भाऊजी, आपल्या सासूबाईंच्या पायां पडून त्यांचा आशीर्वाद मागून घ्या. आणि तुमचा हात जरा इकडे द्या. ( वसंत व लीला हात मागें घेतात ) हूं काय ! वसंत लीला एके ठिकाणीं आणण्याचा मान सगुणेला, भाऊजी, तुम्ही जिला मातृस्थानी समजतां त्या तुमच्या वहिनीला—हा मान मिळवूं द्यायचा नाहीं कां ! कां मानपानाचा करार आधींच व्हायला पाहिजे, म्हणून हा रुसवा आहे ?

वसंत—तसेही म्हणतां येईल, वहिनी आतांच्या तरुणानीं, निदान माझ्या सारख्या महात्माजींच्या अनुयायी तरुणानीं तरी हा स्वार्थी संसार तूर्त बाजूलाच सारला पाहिजे. किंवा दुसऱ्या तऱ्हेनें म्हणायचें तर मला स्वराज्याचा हुंडा पाहिजे; हा हुंडा पदरांत पडल्याखेरीज नवरदेव लग्नाला उठत नाहीं आणि वधूचाही गौरीहर सुटत नाहीं.

उमा—म्हणजे ? याचा अर्थ तरी काय ?

काका—याचा अर्थ तुम्हाला इष्ट असाच आहेना ? वसंत, आपल्या लीले- शीं लग्न करून घ्यायला तयार नाहीं. त्याला तूर्त लग्नच करायचें नाहीं. पण तुमच्या दृष्टीच्या या सुयोगाला दुसरी एक अडचण आहे. पहा, लीले सांगूच कां आतां ? लीलाही वसंताशिवाय दुसऱ्या कोणाच्याही गळ्यांत माळ घालणार नाहीं.

सगुणा—हें मोठेंच कोडें घातलें ! मग आतां पुढें !

उमा—इश्श ! मला सुद्धां वसंतच जावई हवा आहे, बरें कां ? माझ्या लीलेला ज्यांत सुख त्यांतच आम्हांलाही साहजीक सुख वाटणार. पण बाई हें काय ? लग्नच करून घ्यायचें नाहीं म्हटल्यावर मग पुढें ?

त्रिंबक—वसंता, तुझा विचार तरी काय ठरला आहे तो एकदां, स्पष्ट सांग, तूं म्हणशील तें आम्हांला पसंतच आहे. आतां उगीच सगळ्यांना घोटा- ळ्यांत ठेवूं नकोस.

वसंत—दादा, यांत विशेष गूढ असें कांहींच नाहीं. ज्या महत्कार्यासाठी आम्हीं गांधी टोपी डोकीला चढविली, अस्पृश्यतेचा खरा मन:पूर्वक स्वीकार करून सर्व राष्ट्राची पूर्ण आत्मशुद्धि झाली असे केवळ राज्यकर्त्यांनाच नव्हे तर संपूर्ण जगाला दाखविण्याचा हा शांततेचा प्रयत्न चालविला, तें महत्कार्य संपा-

दन होऊन राष्ट्रपुरुषांचें आत्मे कृतार्थ होईपर्यंत लग्नाची सोपस्कार करून घ्यायचा नाहीं अशी आम्हां दोघांचीही प्रतिज्ञा आहे.

वेणू—शाबास, वसंता शाबास! तुझ्यासारखे कर्मवीर उत्पन्न होऊं लागले हें राष्ट्राच्या उदयाचेंच चिन्ह आहे.

त्रिंबक—बाळांनो, तुम्ही आपल्या या तेजस्वी निश्चयानें आम्हां वडिलांनाही लाजावलत धन्य तुमची—

काका—धन्य थोर महात्म्यांची-धन्य आमच्या जननी जन्मभूमीची—

वसंत व लीला—वंदे मातरम्! [ पडदा पडतो.



समाप्त.





